

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत




वर्ष ५५ । अंक १२ । सप्टेंबर २००२

Map
OF THE
ISLAND OF BOMBAY
CONSTRUCTED ON REDUCTION
FROM COLONEL LAUGHTON'S MAP OF 1872.
WITH ALTERATIONS PRINCIPALLY AS REGARDS NEW ROADS UP TO
1897.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५५ । अंक १२ । सप्टेंबर २००२
श्रावण-भाद्रपद, शके १९२४
किंमत रु. २०/-
वार्षिक वर्गणी रु. २००/-

या अंकातील लेखांत व्यक्त झालेल्या मतांशी संचालक व संपादक सहमत असतीलंच, असे नाही.




## *नवभारत*ची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* *नवभारत*, ऑक्टोबर, १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.

**प्राज्ञपाठशाळामंडळ**
**अध्यक्ष व विश्वस्त :**
सरोजा भाटे

**कार्यकारी संपादक :**
यशवंत सुमंत

**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ,
वाई - ४१२ ८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री.ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई - ४१२ ८०३ (जि. सातारा)

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियतकालिकाचा मंडळाच्या "नियतकालिकांचा स्थायी निधी" योजनेत समावेश केला असला तरी या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्य शासन सहमत असेलच, असे नाही.

अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# नवभारत

## अ नु क्र म


लेख

पेशव्यांच्या मुलुखाच्या आर्थिक-राजकीय व्यवस्थेवरील इंग्रजी राज्याचा आघात : १६८९-१९४७ (उत्तरार्ध) — १
- नीरज हातेकर

राष्ट्रांची श्रीमंती आणि गरिबी — २४
- श्री.मा. भावे

*प्रारंभ*च्या निमित्ताने — ३२
- वसंत पळशीकर

मनुष्यस्वभावप्रकृती आणि मानवीय अर्थशास्त्राची तात्त्विक मांडणी — ४३
- केनेथ बुल्डिंग


अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वाई

# पेशव्यांच्या मुलुखाच्या आर्थिक-राजकीय व्यवस्थेवरील इंग्रजी राज्याचा आघात : १६८९-१९४७

(उत्तरार्ध)

नीरज हातेकर

आता आपण राज्यसत्ता आणि महसुली हक्कांसाठी इच्छुक असलेल्या गटांमधील व्यक्तींचा परस्परसंबंध जरा बारकाईने पडताळून पाहू. अर्जोजी आणि गिर्जोजी जाधव या जाधवबंधूंचे व्यवहार ह्या दृष्टीने उद्‌बोधक आहेत. जाधवबंधूंनी शिवाजी महाराजांच्या काळापासून शिवाजी (दुसरा) पर्यंत वेगवेगळ्या मराठी राज्यांच्या सेवेत राहून कराड प्रान्ताची देशमुखी मिळविण्याचे आटोकाट प्रयत्न केले. त्याच प्रयत्नात औरंगजेब आणि कामबक्ष यांच्याशीसुद्धा त्यांनी संबंध प्रस्थापित केले.[३३] कऱ्हाडच्या मुघल फौजदाराशी, (त्याला मराठ्यांच्या तावडीतून सोडविण्यासाठी खंडणी भरण्याइतपत), त्यांनी मैत्री वाढवली. महसुली हक्क संपादण्याचे प्रयत्न करतानाच जाधवबंधू, दुसरीकडे, मोठ्या प्रमाणावर बांधकामाची कंत्राटी कामे घेताना दिसतात. एका वेळी त्यांच्याकडे दहा हजार कामगार काम करीत असत. जिंजीच्या वेढ्यातून राजारामाची सुटका 'मॅनेज' करण्यापर्यंत त्यांचे संबंध मुघल सरदारांशी होते.[३४] जाधवबंधू म्हणजे काशी रंगनाथाची 'मोठी प्रतिकृती' असे म्हणता येईल.

जाधव कुटुंबाचा शोध घेताना आपल्याला प्रथम त्याचा पूर्वज लखुजी जाधव भेटतो. हा १६व्या शतकाच्या आरंभी वहामनी राज्यात मनसबदार होता. लखुजीने औंधमधील २७ गावांची देशमुखी जगदेवराव जगदाळे यांच्याकडून दहा हजार होन देऊन घेतली, असा उल्लेख आहे. जगदेवरावकडे कराडमधील एकशे अडुसष्ट गावांची देशमुखी होती. शेतसारा गोळा करायला नेमलेल्या अधिकाऱ्यांनी गद्दारी केल्यामुळे नंतर जगदाळे कुटुंबाची वाताहत झाली. समकालीन लोक जगदाळे कुटुंबाचा निर्वंश झाला असे मानीत. १६३० च्या आसपास मुधोजी निंबाळकराने केलेल्या स्वारीत संभाजी आणि आबाजी जाधव सामील झाले असावेत की नाही, ह्याबाबत काही सांगता येणार नाही. परंतु त्यांनी मुधोजीकडून साऱ्यात सूट मिळवली असा उल्लेख आहे. जाधवबंधू फितूर झाले असा अर्थ लावून आदिलशहाने जाधवांचे वतन जप्त केले. ह्यानंतर केलेल्या सर्व अर्जांमध्ये जाधव आपल्याकडे, औंधमधील सत्तावीस गावेच नव्हे तर, कऱ्हाडमधील एकशे अडुसष्ट गावांचे वतन होते, असे म्हणतात. ह्या काळात कऱ्हाडची देशमुखी कोणाकडे होती ह्याची नक्की माहिती काढणे अवघड आहे.

नंतरच्या काळात जगदाळेंनी केलेल्या अर्जांमध्ये हे वतन त्यांच्याकडे वंशपरंपरा असल्याचे म्हटलेले आढळते. वतनांवर हक्क सांगणारे अशी कागदपत्रे तयार करीत; ती रीतच होती. कराडची देशमुखी आदिलशहाच्या स्वाधीन राहिली; ती त्याने एकानंतर एक, अनेक वजीरांना बहाल केली; पुढे ती रणदुल्लाखानाकडे आल्याचे दिसते. अखेरीस ती शहाजी भोसले यांच्याकडे आल्याचे दिसते. दुसऱ्या शिवाजी राजांकडून जाधवांना जी अनेक इनामपत्रे प्राप्त झाली त्यांपैकी एकामध्ये, निंबाळकरांच्या उठावामध्ये आपली कराडची देशमुखी हातची गेल्याचा उल्लेख जाधवांनी केल्याचे आढळते. शिवाजी महाराजांनी औंधमधील २७ गावांचे वतन जाधवांना बहाल केले असाही उल्लेख आहे. ते काहीही असो, शिवाजीमहाराजांनी अर्जोजीला किल्ले प्रतापगडची डागडुजी करण्यास व गडावर काही नवीन बांधकामे करण्यास सांगितले. अर्जोजी व हिरोजी फर्जंद प्रत्येकी दहा हजार माणसे व 'कारखाने' घेऊन प्रतापगडावर हजर झाले. हे काम पूर्ण झाल्यावर अर्जोजीने कराडची देशमुखी मिळावी यासाठी शिवाजीमहाराजांकडे अर्ज केला. ह्या वेळेस महाराजांनी औंधमधील २७ गावांचे वतन अर्जोजीला बहाल केल्याचे दिसते. मग महाराजांनी अर्जोजी व हिरोजी फर्जंद यांना पावनगडावर बांधकामे करण्याचे काम दिले. बांधकामांची तपासणी करावयास शिवाजीमहाराज गेले असता अर्जोजीने दोन्ही वतनांचा प्रश्न काढला. हिरोजी फर्जंद याने अर्जोजीच्या बाजूने मध्यस्थी केली. महाराजांनी याला नकार दिला आणि अर्जोजीच्या नातलगांना हाकलून दिले. अर्जोजीने रागावून काम सोडून दिले. हिरोजीच्या मध्यस्थीमुळे ५००० होनांच्या मोबदल्यात (पावनगडाच्या बांधकामासाठी पाच हजार होन हा अर्जोजीचा मोबदला ठरला होता.) औंधचे

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वतन अर्जोजीला परत द्यायला महाराज राजी झाले. पण राजारामाच्या लग्नाचे कारण सांगून शिवाजीमहाराजांनी हुकुमनामा काढण्याचे टाळले. त्यानंतर शिवाजीमहाराजांचे निधन झाले आणि कागदपत्रे तयार करायचे काम तसेच राहिले.

पुढे संभाजीमहाराजांनी रायगडावर व पाचाडला इमारती बांधण्याचे काम अर्जोजीवर सोपविले. हे काम पूर्ण झाल्यावर अर्जोजीने संभाजीला ५००० होन पेशगीदाखल देऊन कराड व औंधचे, दोन्ही, मूळ वतनीहक्क बहाल करण्यास विनंती केली. किमानपक्षी औंधमधील २७ गावांचे वतन बहाल करण्याची विनंती केली. संभाजी तयार झाला, पण कवी कलशाला भेटल्यावर हे काम करू म्हणून कागदपत्रांचे काम संभाजीने लांबणीवर टाकले. ह्या दरम्यान कराडचा देशमुख असलेला तुळाजी कडू कवी कलशाला भेटला आणि जाधवांना औंधची देशमुखी मिळाल्यास कऱ्हाडच्या देशमुखीवरील त्यांचा हक्क ते गमावतील, असे त्याने सांगितले. हे निमित्त पुढे करून कवी कलशाने औंधच्या देशमुखीचे कागदपत्र तयार करण्याचे काम लांबणीवर टाकले. जाधवांनी कलशाला १००० टके, शंभर होन आणि एक उमदा अरबी घोडा दिल्यावर कलश कागदपत्र तयार करण्यास राजी झाला. परंतु कागदपत्र तयार होण्याआधीच कलश आणि संभाजी राजापुरला गेले; संभाजी राजापुराहून रायगडावर गेला आणि कलश पन्हाळगडा-कडे रवाना झाला. कलश आपल्या सोबत गिर्जोजी जाधवाचा एक भाऊबंद पदाजी जाधव ह्याला कागदपत्र करण्यासाठी म्हणून घेऊन गेला. पन्हाळगडावर, तुळाजी कडू परत कलशाला भेटला व त्याने, जाधवांनी जमातदार असतानाचे १६००० होन अजून सरकारजमा न केल्याचे कलशाला सांगितले. पदाजी जाधव घाबरून पन्हाळगडावरून पळून गेला. या कारणाने कागदपत्रे करण्याचे काम तसेच राहिले. जाधव संगमेश्वरला जाऊन कलशाला भेटले आणि त्यांनी त्याला २००० होनांचा नजराणा दिला. कागदपत्रांची सर्व तयारी होते न होते तेवढ्यात संभाजी आणि कवी कलश मुघलांच्या तावडीत सापडले. राजाराममहाराजांनी शाहूला आणि राण्यांना रायगडाच्या वेढ्यातून सोडवून आणण्यास गिर्जोजीला सांगितले. माणसे सोडविण्यात गिर्जोजीला अपयश आले तरीसुद्धा रायगडावरील मौल्यवान चीजवस्तू घेऊन तो पन्हाळगडावर पोचला. त्यानंतर हा सर्व खजिना त्याने जिंजीला सुखरूपपणे राजारामाच्या सुपूर्द केला. राजारामाने गिर्जोजीला मानाचे कपडे व ५००० चक्रे बहाल केली. गिर्जोजीने तीच चक्रे राजारामाला तत्काळ नजर केली आणि आपल्याला देशमुखीची वतनपत्रे देण्याची विनंती केली. राजारामाने औंधची वतनपत्रे करून दिली पण कराड प्रांताच्या देशमुखीचे घोंगडे तसेच भिजत राहिले. त्यानंतर जिंजीच्या मुक्कामात, वेगवेगळ्या प्रसंगी राजारामाने गिर्जोजीला बक्षीस द्यावे, गिर्जोजीने तेच बक्षीस नजर म्हणून सरकारजमा करावे आणि कराडच्या देशमुखीची मागणी करावी असा प्रकार सुरू राहिला. शेवटी राजारामाने उंब्रज आणि तारगावच्या देशमुखीची वतनपत्रे गिर्जोजीस करून दिली. जगदेवराव जगदाळे याचा वंशज महादजी जगदाळे ह्या वेळेस जिंजीला पोहोचला आणि मसूरच्या देशमुखीवर – कराड प्रांतातील एक भाग – त्याचा हक्क पोचत असल्याचे निवेदन त्याने केले. गिर्जोजीने तत्परतेने राजारामाला ५००० होन नजर केले. तेवढ्यात जिंजीला वेढा पडला आणि राजारामाचा अनौरस पुत्र राजा कर्ण ह्याला मुघल सरदार झुल्फिकारखानाकडे ओलीस ठेवणे भाग पडले. गिर्जोजी कर्णाबरोबर झुल्फिकारखानाकडे गेला आणि मुघल सैन्यातल्या आपल्या संबंधांचा वापर करून कर्णाला सुरक्षितपणे परत आणण्यात यशस्वी झाला. ह्या प्रसंगी राजारामाने गिर्जोजीला एक लाख रुपये बक्षीस दिले. नेहमीप्रमाणे हे पैसे गिर्जोजीने राजारामाला नजर केले आणि वतनपत्राची मागणी केली. वेढा जास्त कडक झाला तेव्हा राजारामाने जिंजीहून पलायन केले. गिर्जोजीने मुघल सैन्यातील आपल्या संबंधांचा पुन्हा उपयोग केला व शिरवाडकर वाणी ह्या अंमलदाराला लाच देऊन ताराबाई, गर्भवती राजसबाई आणि युवराज शिवाजी दुसरा ह्यांची वेढ्यातून सोडवणूक करून, ह्यांना घेऊन तो वेरूळला राजारामाकडे पोहोचला. ह्याच वेळेस काशी रंगनाथसुद्धा राजारामाकडे तैनात होता. राजारामाने बक्षिशी देऊ केली तेव्हा बक्षिशीऐवजी गिर्जोजीने पुन्हा वतनपत्राची मागणी केली. राजारामाने वतनपत्रे करण्याची तयारी दाखवली पण प्रत्यक्षात काहीच केले नाही. ह्या वेळी राजसबाईच्या पोटी संभाजी दुसरा ह्याचा जन्म झाला. राजसबाईने गिर्जोजीची वतनपत्रे होईपर्यंत बाळाचे बारसे करणार नाही असा हट्ट धरला. राजारामाने वतनपत्रे केली; परंतु गिर्जोजी उपलब्ध नसल्यामुळे त्या कागदपत्रांवर राजमुद्रा उठवली गेली नाही. ह्याच वेळेस तारगाव आणि उंब्रज येथील सारा गोळा करण्यात गिर्जोजीचे भाऊबंद अपयशी ठरत होते. गिर्जोजीने









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

खास माणसे पाठवून गावकऱ्यांशी समझोता केला. इकडे राजारामाचे निधन झाले आणि शिवाजी दुसरा राज्यावर आला. राज्याभिषेकाच्या वेळेस गिर्जोजीने ५००० होन नजराणा दिला आणि देशमुखीची मागणी केली. पुन्हा धामधुमीमुळे वतनपत्रे तयार होऊ शकली नाहीत. शिवाजी प्रतापगडावर पळून गेला. शेवटी प्रतापगडावर गिर्जोजीला त्याला हवी असलेली वतनपत्रे करून देण्यात आली.

ह्या वेळी यासीनखान हा कराडचा मुघल फौजदार होता. त्याचा भाऊ नियामतखान मराठ्यांच्या तावडीत सापडला. मराठ्यांनी रु. १५००० खंडणी मागितली. त्याचा 'आपल्या वतनाला उपयोग होईल' म्हणून गिर्जोजीने हे पैसे यासीनखानाच्या वतीने भरले. एवढेच नव्हे तर गिर्जोजीने यासीनखानला रु. ३०,०००, घोडा, ढाल-तलवार आणि मानाचे कपडे भेट दिले. (अठराव्या शतकाच्या पूर्वार्धात महाराष्ट्रात सुरू असलेला संघर्ष सर्वार्थाने 'मुघल' विरुद्ध 'मराठे' असा नव्हता; किंबहुना 'मुघल' आणि 'मराठे' असे एकसंध, परस्परविरोधी घटक ह्या कालखंडात अस्तित्वातच नव्हते असे आपल्याला म्हणता येईल. 'मुघल' विरुद्ध 'मराठा' असे चित्र रंगविण्यास बहुधा नंतरचे ब्रिटिश आणि राष्ट्रवादी भारतीय इतिहासकार जबाबदार असावेत. आजच्या पुन-रुज्जीवित हिंदुत्वाच्या पार्श्वभूमीवर हा मुद्दा तपासून पाहणे अत्यंत आवश्यक आहे.)

औरंगजेबाने यासीनखानाला परत बोलावले. यासीनखान मराठ्यांना फितुर झाला असल्याची शंका औरंगजेबास आली असावी. त्यानंतर शाहूने कराड जिंकून घेतले व जगदाळेच्या मसूरच्या देशमुखीवर परत शिक्कामोर्तब केले. मध्यंतरीच्या काळात महादजी दोनदा जिंजीला जाऊन आला होताच. राजारामाच्या दरबारात महादजी जगदाळे पण खटपटी-लटपटी करीत होताच. राजारामाला दोन हजार होनांचा नजराणा बहाल केल्यावर राजारामाने मसूरची देशमुखी जगदाळेला दिली होती. कराड प्रांतावर शाहूने आपला कब्जा प्रस्थापित केल्यावर, गिर्जोजीचा भाऊ शंकराजी जाधव शाहूला भेटला आणि आपल्या वतनपत्रावर शिक्कामोर्तब करून घेतले. १७०३ साली, मराठा राजांशी स्वामिनिष्ठ असल्याचे एकीकडे सांगत असतानाच जाधव मंडळी औरंगजेबाच्या दरबारीही पोचली होती, आणि ३२००० रुपयांचा नजराणा देऊन त्याचे फर्मान व सनद त्यांनी प्राप्त करून घेतली होती. म्हणजे तीस-पस्तीस वर्षांच्या कालावधीत जाधवांनी कराड आणि औंधच्या देशमुखीसाठी जवळपास चार लक्ष रुपये पाच राजांना देण्यासाठी खर्च केले. एवढे करून वतन मिळाल्यावर गिर्जोजीच्या भाऊबंदांनी गिर्जोजीला न विचारता वतनाचे हिस्से धनाजी जाधव व यासीनखान यांना विकावयास सुरुवात केली. गिर्जोजीने पुन्हा साऱ्या वतनावर आपला अधिकार प्रस्थापित केला. आपल्या भाऊबंदांकडून, त्यांचा वतनावर कोणताही मालकीहक्क नसल्याचा करारनामा गिर्जोजीने लिहून घेतला. तरी परंतु गिर्जोजीला, १७१६ साली, त्याचे वतन स्वरूपजीसोबत वाटून घेणे भाग पडल्याचे दिसते. ताराबाईच्या कारकीर्दीत देशमुखीवर धनाजी जाधव स्वतःचा हक्क सांगताना आढळून येतो. गिर्जोजीला त्याच्यापासून वतन सुरक्षित राखण्यासाठी जागरूक राहून संघर्ष करावा लागलेला दिसतो. ताराबाईने गिर्जोजीच्या बाजूने दोनएक वेळेला हस्तक्षेप करून धनाजीला समज दिलेली आढळते. गिर्जोजीचे नातलग मुघलांना जाऊन मिळालेले दिसतात. ते आपले बस्तान भक्कमपणे जमविण्याच्या प्रयत्नात दिसतात. मराठा स्वराज्याचा नवा सरदेशमुख हिंदुराव घोरपडे याने औंधची देशमुखी सिदोजी घोरपडे याला बहाल केली. त्याच्याकडून गिर्जोजीने ती परत हस्तगत केली. या सर्व काळात गिर्जोजीने इतरही इनामे संपादित केली. १७५० मध्ये आपल्याला वयोवृद्ध गिर्जोजी शेवटचे भेटतात. त्या वेळी कोल्हापुरच्या गादीवरील नवीन राणीने, राजाने वेळप्रसंगी दरबारी मानकऱ्यांना द्यावयाच्या 'भेटीं'संबंधी त्यांचा सल्ला विचारलेला आढळतो. एव्हाना गिर्जोजी कोल्हापूर दरबारातील एक मातबर सरदार म्हणून प्रस्थापित झाले होते असा निष्कर्ष निघतो.

अर्जोजी-गिर्जोजींच्या दीर्घ कारकीर्दीत आपल्याला महसुली वतनी हक्कांचे महत्त्व आणि ते टिकविण्यासाठी करावे लागणारे डावपेच दिसतात. गिर्जोजीचा पूर्वज हा संपन्न माणूस असला पाहिजे, कारण बहामनी राजवटीच्या काळात तो मनसबदार या हुद्द्यापर्यंत पोचला होता. त्याचे वंशज युद्धासाठी, किल्ले व राजवाडे यांचे बांधकाम करण्यासाठी मनुष्यबळ आणि साधनसामग्री पुरविताना दिसतात. गिर्जोजी जाधव दोन हजार माणसांसाठी धान्याचा पुरवठा अल्पावधीत करू शकत असे ह्याचासुद्धा पुरावा आढळतो. राजकीयदृष्ट्या महत्त्वाच्या असलेल्या कित्येक मुघल आणि मराठा व्यक्तींशी गिर्जोजीचे घनिष्ठ संबंध होते. आपल्या सोयीप्रमाणे तो मुघल व मराठा राजसत्तांचा उपयोग करून घेताना दिसतो. कोल्हापुरकर भोसले, शाहूमहाराज, औरंगजेब यांच्यापैकी, आलटूनपालटून,


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सोयीनुसार, आपली स्वामिनिष्ठा बदलताना तो आपल्याला आढळतो. यशस्वीपणे संघर्षाचे नियमन करून, संघर्षाचा उपयोग स्वतःच्या आर्थिक आणि सामाजिक अभ्युदयासाठी तो करून घेत असे, अठराव्या शतकातील राजसत्तांसाठी अशा व्यक्ती म्हणजे मोठे आव्हानच असणार. अशा व्यक्तींवर राजसत्ता सैनिकी बळ आणि राजकीय पाठिंबा यासाठी अवलंबून असत. ह्या व्यक्तींची मात्र स्वतःची वेगळी साध्ये असत. त्यांच्या व्यक्तिगत स्वार्थी उद्दिष्टांचा आपल्या राजकीय उलाढालींमध्ये समावेश केल्याशिवाय तत्कालीन राजसत्ता स्वतःची सत्ता राखू शकत नसत. अर्थशास्त्राच्या परिभाषेमध्ये याला 'मालक-हस्तक समस्या' ('Principal-Agent Problem') असे म्हणतात. ठराविक मोबदला देण्याच्या बोलीवर मालक हस्तकावर विशिष्ट काम पार पाडण्याची जबाबदारी टाकतो. पण हस्तकाची स्वतःची वेगळीच स्वार्थी साध्ये असतात. ती तो मालकापासून दडवून ठेवत असतो. मालकाचे समाधान होईल अशाप्रकारे त्याच्यावर सोपविलेली कामगिरी पार पाडण्यानेच आपली स्वार्थी उद्दिष्टे गाठता येणार आहेत हे हस्तकापर्यंत पोचेल अशा प्रकारे त्याच्याबरोबरचा 'करार' करण्याचे आव्हान मालकासमोर असे. १८व्या शतकात राज्यसत्तेचे असे जे अनेक हस्तक असत त्यांच्यात आपापसात स्वार्थी हितसंबंधांवरून कलह चाललेले असत. या कलहांचे राजकीय व्यवस्थापन हुशारीने करीत राहूनच राजाला त्याच्या हाती राज्यसत्ता टिकविता येत असे. हस्तकांचे स्वतःचे स्वार्थी हेतू काय आहेत याची पूर्ण माहिती राजाला नसे. राज्यसत्ता व हा वरचढ 'भांडवलदार' वर्ग यांचे माहितीवरून असणारे हे asymmetrical संबंध हे वैशिष्ट्य ध्यानात ठेवले पाहिजे. राज्यसंस्था ही भांडवलदार वर्गाचेच विस्तारित अंग ('extended arm of Capital') असते ही मार्क्सवादी संकल्पना येथे काम देत नाही. या गोचीमधून सोडवणूक करून घेण्यासाठी म्हणूनच वतनदारी पद्धती समूळ उखडून टाकण्याचे धोरण शिवाजीमहाराजांनी अंगिकारले, पण त्यांच्या पदरात अपयशच पडले. आपल्या राज्यास उच्चतर उद्दिष्टे, विचारधारा यांचे अधिष्ठान प्राप्त करून देण्याचा – 'गोब्राह्मणप्रतिपालक', 'हिंदवी स्वराज्य', 'धर्मरक्षक' इत्यादी – भोसले कुळाने सातत्याने प्रयत्न केला. पण सार्वभौम राज्यसत्ता हाती राखण्यासाठी त्यांना हस्तकांवर अवलंबून राहणे भाग होते. ज्यांचे लक्ष व शक्ती स्वतःच्या स्वार्थी हितसंबंधांवरच केंद्रित राहिली.

गिर्जोजीसारख्या व्यक्ती राजकीयदृष्ट्या महत्त्वाच्या मातबर असामींशी संधान राखण्यासाठी पैसा व इतर साधनांची बरीच मोठी गुंतवणूक करीत असत हे आपणास दिसते. त्यांच्या राजकारणी तंत्रांशी व शैलीशी अनुरूप अशीच ती गोष्ट म्हणायला हवी. मुघल अंमलदार यासीनखानास आपल्या बाजूला वळविण्यासाठी व त्याचा पाठिंबा टिकविण्यासाठी ५०,००० रुपयांपेक्षाही जास्त खर्च केल्याचे आपण वर पाहिलेच आहे. कुटुंब-गोतावळा यांच्या ऐहिक अभ्युदयासाठी भांडवल गुंतविण्याला मोठा अग्रक्रम होता ही गोष्ट यावरून स्पष्ट होते. ही माणसे पुरेशी व्यक्तिवादीही वर्तन करीत असल्याचे आढळते. आपल्या नातलगांचा सहभाग ते अशा सर्व व्यवहारांमध्ये घेत, पण त्यांचा स्वतःचा व्यक्तिगत उत्कर्ष होत राहील याविषयी ते खबरदारी घेत. त्या शर्तीवरच ते गोतावळ्याकडून मदत घेत. या प्रयत्नांत त्यांना नेहमीच यश येत असे असे नाही. नातलग मंडळींची आपल्या मार्गात अडचण होत आहे असे अनुभवाला आल्यास त्यांचा अडथळा दूर केल्याचीही उदाहरणे आढळतात. पिराजीसारख्या लांबच्या नातेवाईकास गिर्जोजी झटकून टाकू शकला पण त्याच्या चुलत-भावा स्वरूपजी-सोबत वतनाची वाटणी गिर्जोजीला करावी ही लागलीच. 'राजकीय सत्तासंपादनाच्या क्षेत्रा'तील 'उद्योजक' असे गिर्जोजीसारख्या व्यक्तींना उद्देशून म्हणावयास प्रत्यवाय नसावा.

सार्वभौम सत्ताधाऱ्यांच्या दृष्टीने वतनी हक्कांसाठी चालणारे हे कलह उपयोगी असल्याचे दिसते. या कलहांची सोडवणूक करण्याच्या मिषाने त्यांना पैसाही उपलब्ध होत असे आणि लष्करी व राजकीय सेवाही उपलब्ध होत असत. जाधवांच्या अर्जांना कधी नकार न देता, पण प्रत्यक्षात पक्की कागदपत्रे करून देण्याची गोष्ट पुढे ढकलीत राहात, राज्यसंस्थेने जाधवमंडळींकडून पैसा व सेवा मिळवीत राहण्यात पुष्कळ काळ यश संपादन केले असे दिसते. त्याच काळात, प्रतिस्पर्धी जगदाळे कुटुंबियांकडूनही राजाराममहाराजांनी पैसा व सेवा पदरात पाडून घेतली. कर्जाऊ रकमा घेणे आणि हक्क प्रदान करणे यांचा सरळ सरळ संबंध प्रस्थापित करण्याची रीत १८ व्या शतकातील राज्यकर्ते अवलंबीत असे दिसते. सर्वसामान्य व्यापारी व शेतकरी यांच्या तुलनेने त्यांना स्वस्तात रकमा कर्जाऊ घेता येत. कर्जाऊ रकमा देणाऱ्यांना, पैशाच्या मोबदल्यामध्ये आर्थिक व अन्य प्रकारचे लाभ पदरात पाडून





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

घेता येतील अशी पदे प्राप्त करून घेता येण्याचे, व त्याद्वारा आर्थिक व सामाजिक भरभराट साधून घेता येण्याचे, आकर्षण असे. व्याजाचे उत्पन्न सोडून द्यावे लागत असले तरी, अशी गुंतवणूक करणाऱ्यांना त्या बदल्यात पदरात पाडून घेता येणारे लाभ जास्त वाटत. मात्र वतनी हक्कांसाठी स्पर्धेत उतरलेल्या व्यक्तींचा या प्रकारे फायदा उठविण्याबाबतीत राज्यसत्तांवरही काही मर्यादा असत. कारण अशा व्यक्ती एकाहून अधिक सार्वभौम राज्यसत्तांना – ज्यांच्यात सत्ताविस्तारासाठी स्पर्धा असे – पैसा, पाठिंबा व सेवा देऊ करीत; आणि तसे करण्यास मोकळ्या पण असत. कारण या स्पर्धकांचा संबंध अनेक स्पर्धक राज्यसत्तांशी एकाच वेळी असे.

कोल्हापूर छत्रपतींकडून नाराज होणाऱ्या व्यक्ती मुघलांकडे वा शाहू छत्रपतींकडे वळू शकत असत. राजकीय आघाडीवर असलेले हे 'खुलेपण' आणि राज्यसत्तांमधील स्पर्धा ह्यामुळे राज्यांच्या सार्वभौमत्वास मोठी मर्यादा पडत असे. एखादा प्रदेश जिंकून घ्यावयाचा याचा अर्थ, लढाईत यश मिळविणे यापेक्षा त्या प्रदेशातील वतनदार अभिजनवर्गाचा पाठिंबा मिळविणे असा असे. अशा अभिजनांना महसुली हक्कांचे मूल्य टिकवून ठेवण्यात साहजिकच रस असल्यामुळे, मोठ्या प्रमाणावर शेतीची नासधूस करणारा संघर्ष टाळत राहणे प्राप्तच होते. साधारणपणे जी काही नासधूस होत असे ती अल्पकालीन असे. कराडची देशमुखी संपादित करण्यासाठी गिर्जोजीने अनेक वर्षे इतक्या निकराने आटोकाट प्रयत्न एरवी केले नसते आणि एवढा पैसाही खर्च केला नसता. एकदा देशमुखी वतन हस्तगत केल्यावर गिर्जोजीने देशमुखी गावांमधील रीती, उद्योग व व्यापार यांची चांगली व्यवस्था लावली असली पाहिजे; कारण पुढे आपल्या वारसदारांमध्ये वतनाचे त्याने रीतसर वाटे पाडल्याचे दिसते. कराडची देशमुखी संपादण्यासाठी शंभरहून अधिक वर्षे अनेक मातबर असामींमध्ये तीव्र चुरस होती. गिर्जोजी या सर्वांना पुरून उरले. म्हणजेच या सर्व काळात ही देशमुखी मोठा फायदा करून देणारी राहिली असली पाहिजे.

अठराव्या शतकाच्या सुरुवातीला महाराष्ट्रात दोन पातळ्यांवर संघर्ष होताना दिसतात. पहिल्या पातळीवरचा संघर्ष महाराष्ट्रावरच्या मुघलांच्या हल्ल्याशी निगडित होता. ह्या संघर्षात जरी आर्थिक आणि सामाजिक व्यवस्थेत गोंधळाची स्थिती निर्माण झाली असली तरीसुद्धा त्याच संघर्षाने गिर्जोजी, धनाजी जाधव, हिंदुराव घोरपडेंसारख्या अनेक व्यक्तींना सामाजिक व आर्थिक अभ्युदयाची संधी मिळवून दिली. दुसऱ्या पातळीवरचा संघर्ष सदर 'राजकीय उद्योजकां'मधील वतनांसाठीच्या स्पर्धेतून जन्माला आलेला दिसतो. ह्या संघर्षात वेगवेगळ्या राज्यसत्तांना साधनसामग्री, मनुष्यबळ आणि राजकीय पाठिंबा ह्यांचा स्पर्धात्मक पुरवठा करणे, तसेच एकमेकांच्या ताब्यात असलेल्या गावांमधील फुटीर गट स्वतःकडे आकृष्ट करून घेणे हे तंत्र प्रामुख्याने अवलंबिलेले दिसते. या संघर्षातून होणारे नुकसान सीमित करण्याकडे सगळ्यांचाच कल होता असे दिसते. गिर्जोजीच्या दीर्घ कारकीर्दीत त्याचे वतन असलेल्या भूभागाचे मोठ्या प्रमाणावर नुकसान झाल्याचे आढळून येत नाही. युद्धाने आणि अतिरेकी जकातीमुळे सुपे परगण्यातील व्यापाराचे नुकसान झाले होते. 'ह्यामुळे सरकारचे नुकसान होते' असे कारण देऊन शाहूने जकातीचे बारकाईने नियमन करणारा हुकूम काढला.[३५] मावळ भागात चांगोजी जाधव शेटे ह्यांनी १७१४ मध्ये नवीन पेठ वसवली. ह्या पेठेची भरभराट व्हावी म्हणून चार वर्षांसाठी करमाफी दिली गेली होती.[३६] स्थानिक राजकारणामुळे अर्जोजी कुसुरकर हा कुसुर गावातून परांगदा झाला होता. दुसऱ्या शिवाजीने त्याला अभयदान देऊन, गावी परत यावे म्हणून हुकूम काढला.[३७] १७१० साली पुणे प्रांताच्या महाजन, देशमुख आणि देशपांडे ह्यांनी पिलाजी जाधवांना बलुतेदारांच्या हक्काविषयी अर्ज केला होता. सदर अर्जात, युद्धामुळे ओस पडलेली गावे पुन्हा राहती झाल्याचे म्हटले आहे. सर्व बलुतेदार परत आले आहेत, परंतु परिस्थितीचा फायदा घेऊन अवास्तव मागण्या करीत आहेत, असे या अर्जात नमूद केले होते. पिराजीच्या हुकुमावरून देशमुख, देशपांडे आणि महाजन यांनी युद्धापूर्वीच्या स्थानिक पद्धतीचे स्वरूप सदर अर्जात मांडले आहे आणि पिराजीला योग्य ते नियम घालून देण्याची विनंती केली आहे. वरील सर्व उदाहरणांमधून संघर्षाचा परिणाम साधारणपणे अल्पकालीन होत असल्याचे दिसते.[३८]

वरील उदाहरणांपैकी शेवटच्या उदाहरणातून आणखी एका महत्त्वाच्या मुद्यावर प्रकाश पडतो. संघर्षातून समाज-व्यवस्थेची घुसळण होत असे. अशा घुसळणीत काही गट स्वतःचे सामाजिक स्थान नव्याने ठरविण्यात यशस्वी होत असत. पुण्यातील गावे पुन्हा वसल्यावर सोनारांनी ब्राह्मण तसेच कुणबी घरांमध्ये अन्नग्रहण करणे बंद केले. वाणी, कासार आणि पांचालांनी लग्नाच्या वराती बाजारातून नेण्याचा


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हक्क मागण्यास सुरुवात केली. वास्तविक पाहता त्यांना पूर्वी असा हक्क नव्हता. १७८४ मध्ये मुळशी खोऱ्यातील महारांनी, मागील पंधरा ते वीस वर्षांपासून जोशांनी आपली लग्ने लावणे बंद केले आहे, अशी तक्रार केली. रास्त्यांनी ग्रामजोशांना, अशी लग्ने लावणे ही त्यांची वतनदार म्हणून जबाबदारी असल्यामुळे त्यांनी ती लावलीच पाहिजेत, असा हुकूम केला.[३९] वरील प्रकारचे वाद अठराव्या शतकात सतत घडून येत असत. राज्यसत्तेने आणि स्थानिक अभिजनवर्गाने वारंवार 'परंपरागत रूढी' अधोरेखित करणारे हुकूम काढले. 'परंपरागत रूढी'च्या विशिष्ट स्पष्टतेची मागणी करणाऱ्या वेगवेगळ्या गटांचे बलाबल आणि अभिजनवर्गाच्या राजकारणातील त्या घटकांचे स्थान, ह्या दोन्हींवरून 'परंपरागत रूढी' ठरत असत. प्रसंगी 'परंपरागत रूढी' या नव्याने निर्माण केल्या जात. गादीवर नुकत्याच पुनर्स्थापित झालेल्या प्रतापसिंह महाराजांनी १८३० साली एक फर्मान काढून सर्व 'मराठ्यां'ना पेशवाईच्या आधीच्या काळातील ज्ञातिधर्माचे पालन करण्याचा हुकूम केला. सदर हुकुमाप्रमाणे पेशवाईत मूळ ज्ञातिधर्माचे पालन होत नव्हते. पेशवाईपूर्व ज्ञातिधर्माचे पालन करण्याची प्रतिज्ञा ह्या वेळेस बेचाळीस मातबर मराठी असामींनी केली होती, असे दिसते.[४०] म्हणजे 'प्राचीन' चालीरीतींची व्याख्या पुन-पुन्हा राजकीय गरजेनुसार आणि राजकीय सोईनुसार केली जात राहिली. नव्याने उत्कर्ष पावलेल्या अभिजनांच्या राजकीय अधिमान्यतेच्या तसेच वैचारिक (आयडियालॉजिकल) गरजेच्या पोटी, 'क्षत्रिय राजा' विषयीच्या आदर्श कल्पनेच्या भोवती जातिव्यवस्थेची पुनर्घटना झाल्याचा मुद्दा सुसन बेली यांनी सप्रमाण मांडला आहे.[४१] या काळातील नवा अभिजनवर्ग वस्तुतः सामान्य बहुजनांमधून (कुणब्यांमधून) उत्कर्ष पावला होता. त्याच्या हाती सत्ता आल्यावर त्याच्या राजकारणाला वजन व प्रतिष्ठा मिळवून घेण्यासाठी तो चातुर्वर्ण्याधिष्ठित जातिव्यवस्थेची परिभाषा व चिन्हे-प्रतीके यांचा अंगीकार करण्याकडे तत्परतेने व आग्रहाने वळला. पण ज्या गटांना ते 'हीन' गणत त्यांना बरोबर घेऊन चालण्याचेच नव्हे तर, त्यांना संतुष्ट ठेवण्याची चालही अभिजनवर्गीयांना खेळावी लागली असे दिसते. उदाहरणार्थ, पुणे प्रांती बलुतेदारांच्या मागण्यांना धरून जो वाद उपस्थित झाला होता त्याचा निवाडा करताना सोनारांना, ब्राह्मणांच्या घरी अन्नग्रहण करण्यास नकार दिल्याबद्दल, 'ब्राह्मण हे सर्वांमध्ये श्रेष्ठतम होत' या भाषेत जी राज्यसत्ता तंवी भरते व पूर्वापार रूढींचे पालन करणे सोनारांना साध्य करते तीच राज्यसत्ता नागेवाडीतील महारांच्या ब्राह्मणांविरुद्धच्या भांडणात सतत महारांच्या बाजूने निकाल देते. ह्याचे कारण पांडवगड किल्ला राखून ठेवण्यात नागेवाडीच्या महारांच्या सहकार्याला अनन्यसाधारण महत्त्व होते हेच असणार. जातींच्या उतरंडी-मधील परंपरागत उच्चनीच स्थान (ritual ranking) याकडे काणाडोळा करून सत्तेचे राजकारण चालत असे. नवे बलवान अभिजनवर्गीय आपल्या हितसंबंधांना पोषक अशा नव्या उतरंडी रचण्याइतके, वा पूर्वीच्या तथाकथित स्थानांचा 'शोध' लावण्याइतके, वा एकाच पातळीवर अनेक जातींना समान दर्जा देणारी व्यवस्था मान्य करण्याइतके (lateral spread of caste ranking) आत्मविश्वाससंपन्न व नवनवोन्मेषशाली होते. भारतभर एकच एक प्रमाण अशी उच्च-नीच स्थाने प्रदान करणारी एकमुखी अखिल भारतीय जातिव्यवस्था नव्हती. जातपात होती पण तिचे पालन जागोजाग वेगवेगळे आणि बदलत जाणारे असे होते. अठराव्या शतकातील राजकारणाचे प्रवाही, गतिमान, वैशिष्ट्यपूर्ण वास्तव जातपातीच्या या चाकोरीत बंदिस्त नसलेल्या जातपातीच्या व्यवहारांची पुष्टी करणारे होते.

अनेक प्रतिस्पर्धी सार्वभौम राज्यसत्तांच्या छायेखाली वतनांवरून वा अन्य हक्क/लाभ यांच्यावरून उत्पन्न करता येणारे दावे व त्यापोटी होणारे कलह यांमधून हुशार, साहसी व कर्तबगार सामान्य जनांना अभ्युदयाच्या संधी उपलब्ध झाल्या ही एक त्या काळची महत्त्वपूर्ण उपलब्धी म्हटली पाहिजे. आपले व स्पर्धकांचे बलाबल नीट जोखून संधी हेरून चाल खेळण्याचा धोरणीपणा जर बाळगला तर राजकीय-लष्करी उत्कर्षाच्या वाटा खुल्या होत्या. मोसमी पावसावर अवलंबून असलेल्या अवर्षणप्रवण दख्खनमधील जिराईत शेतीखालच्या प्रदेशात या संधी अत्यंत महत्त्वाच्या वाटत असतील. जगदेवराव निंबाळकर आणि मानाजी पवार ह्या दोघांनी बोरीवडे गावावर स्वारी केली. आबाजी चव्हाण-पाटील नावाचा इसम चकमकीत मारला गेला. शिवाजी दुसरा ह्याने, एक उत्तम शेत स्वामीभक्त आबाजीच्या मुलाला देण्याचा हुकूम हिंदुराव घोरपडेला दिला. त्याच गावचा चेनजी चव्हाण पाटील हासुद्धा शिवाजी दुसरा ह्याचा 'स्वामिभक्त' चाकर असल्यामुळे त्याला पाच बिघे जमीन आणि अबदागिरी देऊन तो पुढेही स्वामिभक्त राहील अशी अपेक्षा व्यक्त केली.[४२]

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

वावडे गावातील मल्हारजी, हणमाजी आणि संताजी मर्दाने ह्या 'स्वामिभक्त सेवकां'ना ३/४ चावर जमीन दिली गेली. अंतोजी गंगोजी शिंदे आणि त्याची मुले हे 'पुरातन सेवक' असल्यामुळे अंतोजीला पहिल्या दर्जाची चार बिघा जमीन इनाम मिळाली.[४३] अठराव्या शतकातील कागदपत्रांत सर्वसामान्य कुटुंबे अशी 'भाग्यास आले' असल्याचा उल्लेख बऱ्याच वेळा सापडतो. अशा कुटुंबांतल्या स्त्रियासुद्धा राजकीय संबंधांचा वापर करून स्वतःची अशी उद्दिष्टे पार पाडू शकत असत.[४४] अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात अशा स्त्रियांविषयी परकीय निरीक्षकांनी लिहिले आहे.[४५]

अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात मुघल साम्राज्य खिळखिळे झाल्याने मध्य व उत्तर भारतात राजकीयदृष्ट्या सत्ता-संपादनाच्या व विस्ताराच्या वाटा साहसी, आकांक्षी व कर्तबगार व्यक्ती व गट यांच्यासाठी खुल्या झाल्या. दख्खनमधील नव्याने उत्कर्ष पावलेल्या अभिजनवर्गास त्यांचे राजकारणी कौशल्य महाराष्ट्राबाहेर कारणी लावण्याची मोकळीक उत्पन्न झाली. मुघल प्रभुत्वाच्या कालखंडात अभिजनवर्गासाठी सामाजिक व आर्थिकदृष्ट्या भरभराटीच्या संधी उत्पन्न झाल्या होत्या, आणि त्यांचा फायदा अनेक व्यक्तींनी व गटांनी घेतला होता. अठराव्या शतकाच्या उत्तरार्धातील राजकीय उलाढालींना या सामाजिक-आर्थिक चलनवलनामुळे गती व जोम प्राप्त झाला अशी मीमांसा आता मान्यता पावत आहे.[४६] 'मराठा स्वराज्या'च्या उत्तरेकडील विस्ताराचे दख्खनच्या आर्थिक संरचना व व्यवस्था यांच्यावर दूरगामी परिणाम झाले. राजकारणी उलाढाली आणि सैनिकीकरण या प्रक्रिया सर्वदूर पसरल्या आणि तीव्र झाल्या. दख्खनमधील शेतीतून मिळणारे उत्पन्न तुटपुंजे व बेभरवशाचे होते. या पार्श्वभूमीवर, बदललेल्या राजकीय परिस्थितीने लहान व मध्यम शेतकऱ्यांसाठी संधी उत्पन्न झाल्या. अशा संधी उपलब्ध होण्याची नितांत गरज होती असे म्हणता येईल. सामान्य शिलेदारांचा पगार अठराव्या शतकात वाढत गेल्याचे दिसते. शिपाईगडी म्हणून सैन्यात दाखल होण्यासाठी जो सरंजाम (हत्यारे, पोशाख आदी) जवळ असणे आवश्यक होते त्यासाठी फार पैसा खर्च करावा लागत नसल्यामुळे साधारण धडधाकट व्यक्तीला सैन्यात भरती होता येई. शिपाई म्हणून मुलुखगिरीवर जाण्यामधून चांगला धनलाभ (लुटीच्या स्वरूपात) होण्याची संधी या काळात वाढत गेल्या. महाराष्ट्राबाहेर मोहिमांवर सैन्ये लांबलांबपर्यंत जाऊ लागल्याने दूरवरच्या छावण्यांमध्ये खडे सैन्य बाळगण्याची गरजही वाढली. सैन्यास अन्नधान्य व इतर माल यांचा पुरवठा करावयाचा तर त्यासाठी मोठ्या रकमा कर्जाऊ घेण्याची राजकीय श्रेष्ठींची गरज आता वाढली. या परिस्थितीचा फायदा उठवून भिकाजी नाईक रास्ते आणि तुळशीबागवाले या मोठ्या सावकारांनी सत्तेच्या आखाड्यात स्वतःचा प्रवेश करून घेतला असे दिसते. काशी रंगनाथसारख्याच्यानंतर या व्यवसायात आलेल्या रास्ते-तुळशीबागवाले ब्राह्मण सावकारांच्या अनुभवाला, या कालखंडात, सामाजिक चलनवलन व भरभराट आणखी मोठ्या प्रमाणावर आली. पेशव्यांची सत्ता प्रस्थापित झाली तिचा आधार, सत्तेच्या राजकारणात नव्याने प्रविष्ट झालेल्या, पेशव्यांना एकनिष्ठ असलेला असा एक नवाच समूह होता. पारंपरिक, राजकीय वा आर्थिक सत्ताधारी अभिजनवर्गांमधून या समूहातील व्यक्ती आलेल्या नव्हत्या. त्याच एका ज्ञातीचे सभासदत्व व विवाहसंबंध यांद्वारा निष्ठा अधिक भक्कम केल्या जाऊ शकत होत्या. राज्यविस्ताराच्या या कालखंडामध्ये गिर्जोजीसारख्या आधीच्या अभिजनांमध्ये नव्या मंडळींचा एक लोंढाच दाखल झाला. भारतव्यापी राजकीय परिस्थिती व राजकारण यांना या नव्या श्रेष्ठीवर्गाला भिडावे लागले. पुणे हे भारतातले एक प्रमुख नागर केंद्र बनले. पुण्याची लोकसंख्या एकदेशीय राहिली नाही; ती सरमिसळ झाली. नव्या सरदारवर्गातील व्यक्तींचे वास्तव्य असलेली गावेदेखील लोकसंख्या, आर्थिक उलाढाल या दृष्टीने वाढली. भारतातील सत्ताधारी अमीरउमरावांच्या जीवनशैली व राहणीमानाचे अनुकरण ही नवी सरदार मंडळी करू लागल्याने या नव्या नागरकेंद्रांचीही भरभराट झाली. गावोगावी हवेल्या, प्रासाद, देवळे यांची उभारणी झाली. भारतभरच्या विविध ठिकाणची बांधकामे नजरेसमोर ठेवून आपल्या जहागिरीच्या मुख्य शहरी बांधकामे करण्याची लाटच अठराव्या शतकात आल्याचे दिसून येते. अभिजनवर्गाचे इतर खर्चही बरेच वाढले. १७५५ ते १७६१ ह्या कालावधीत बांधल्या गेलेल्या कात्रजच्या तळ्यावर पुण्यात दोन लाखांच्यावर पैसे खर्च झाले.[४७] त्यासाठीचा बहुतेक पैसा सरकारने कर्ज काढून उभा केला. तुळशीबागेतले देऊळ बांधण्यासाठी रु. एक लाख छत्तीस हजार खर्च झाले. छत्तीस हजार रुपये खर्च करुन पर्वतीचे तळे बांधले गेले. हे सर्व पैसे जयाजी शिंदे बेलदार ह्यांना देण्यात आल्याचा उल्लेख आहे.[४८] कात्रजच्या तळ्याचे पाणी पुणे शहरात आणणाऱ्या पाटाच्या बांधकामासाठी

अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कारागिरांना १७६९ ते १७७१ ह्या कालावधीत सत्तर हजार रुपये दिले गेले.[४९]

नवीन अभिजनवर्गाचा धार्मिक बावींवरचा खर्चसुद्धा मोठ्या प्रमाणात होत असे. बारकाईने पाहता असा खर्च अनुत्पादक वाटत नाही. धार्मिक गोष्टींवर खर्च करून आपले, नवेच असलेले 'अभिजनत्व' सिद्ध करणे ही राजकीय गरज होती. समाजातील आपल्या स्थानाला सामाजिक मान्यता मिळविणे हा यातला महत्त्वाचा उद्देश होता. १७७२ साली सरदार तुळशीबागवाले ह्यांनी लक्षभोजनासाठी अकरा हजार रुपयांपेक्षाही अधिक खर्च एकरकमी केला. सरदार खाजगीवाले यांच्या कुटुंबाचा वार्षिक खर्च ह्या कालखंडात चोवीस ते छत्तीस हजार रुपये होता. एकूण खर्चाची पातळी वर गेल्यामुळे अर्थव्यवस्थेत मागणीची पातळीसुद्धा उंचावते. रोजगाराची उपलब्धता वाढली होती. १७७० साली सर्वसाधारण सुताराला महिना रु.१० ते १५ इतका मोबदला मिळत असे. पाथरवटांना साधारणपणे रु.१२ मिळत.[५०] सरकारदरबारी असलेल्या लेखनिकांना दरमहा रु.२० तर माळ्याला रु.६ इतका पगार मिळत असे. हलालखोरांचा मासिक पगार रु.५ पर्यंत असे. सफाईकामगारांना कमीत कमी रु.३ पगार मिळत असे. ह्याच काळात एका रुपयाला चाळीस किलो ज्वारी मिळत असे.[५१] म्हणजेच कुटुंबातील एकच व्यक्ती काम करत असे, असे गृहीत धरले तरी, दरमहा ४००-६०० शेर ज्वारी विकत घेता येईल इतका मोबदला पुणे शहरात विविध प्रकल्पांवर काम करत असलेल्या कारागिरांना मिळत होता. सफाई कामगार वगैरेंना रोज चार शेर ज्वारी विकत घेता येईल इतका मोबदला मिळत होता. अठराव्या शतकात मजूर-कारागीर यांच्यासाठी बाजारपेठ निर्माण झाली होती, असे म्हणता येईल. नवीन संधींच्या आकर्षणामुळे भारतातील इतर भागांतून सर्व स्तरांतील व्यक्ती महाराष्ट्रात स्थलांतर करून येऊ लागल्या.[५२] त्याचबरोबर महाराष्ट्रात येणारा परप्रांतीय खंडणीचा प्रवाहसुद्धा वाढला. पैसे आणि वस्तू ह्यांच्या प्रवाहांचा समतोल टिकविण्यासाठी महाराष्ट्रात परप्रांतां-तील वस्तू येणे क्रमप्राप्तच होते. त्यामुळे महाराष्ट्रातील स्थानिक उद्योगांवर मात्र दुष्परिणाम झाला. डब्ल्यू.एच. साईक्स या ब्रिटिश अंमलदाराला १८२३ मध्ये पुण्याच्या बाजारपेठेतील जवळजवळ सर्व चांगल्या दर्जाचे कापड शिंदे-होळकर यांच्या जहागिरीच्या मुलुखातून व वऱ्हाडातून किंवा युरोपातून आलेले आढळले.[५३] सर्वांत खालच्या दर्जाचे कापड फक्त स्थानिकरीत्या तयार झालेले होते.

कच्च्या मालाची उपलब्धता आणि कारागिरी कौशल्य ह्यामुळे ज्या भागात कापड अधिक चांगले व स्वस्त तयार होत असे ते आयात होऊ लागल्याने स्थानिक उत्पादनाने मार खाल्ला. पण याचा अर्थ दख्खन मागास भाग होता असा होत नाही. कापडउद्योगात गुंतलेली संसाधने इतर उत्पादक व्यवसायांमध्ये गुंतवणूक करण्यासाठी मोकळी झाली. दख्खनच्या संदर्भात, या व्यापारामुळे संसाधनांचा अधिक कार्यक्षम उत्पादक वापर त्यामुळे शक्य झाला.

येथेच एक गैरसमज दूर करून घेऊ या. अठराव्या शतकात वतनी हक्कांवरून व पदांवरून सतत तंटेबखेडे, फंदफितुरीचे राजकारण, लढाया चालत. पेशव्यांचे राज्य, मुघल, निजाम, व अन्य राज्यसत्ता यांच्यात १८व्या शतकात लढाया सारख्याच चाललेल्या आढळतात. आता, या लढाया अंगदी अटीतटीच्या जरी होत असल्या, आणि मौल्यवान संसाधनांचा नाश होत असला तरी, असा विध्वंस दीर्घकाळ चालू राहात नसे; थोडक्याच काळात त्यावर रोक लागत असे. याची स्पष्टता होण्यासाठी ब्रिटिश राजवट प्रस्थापित होण्यापूर्वीच्या खानदेशच्या स्थितीवर आपण नजर टाकू या. एक चित्र ब्रिटिश कागदपत्रांवरून समोर येते. ते, हा प्रदेश संपूर्ण उजाड बनलेला होता आणि निर्मनुष्य बनलेला होता या स्वरूपाचे आहे. ओसाड पडलेल्या गावांची संख्या खूप मोठी होती. खानदेशात १८०२-०३ या काळात लढाया चाललेल्या होत्या, आणि याच काळात सातपुडा डोंगररांगा आणि गोवळकोंडा (आजचे हैदराबाद) या मधील प्रदेशात मोठा दुष्काळ पडला होता. या कारणांनी मोठ्या संख्येने गावे ओसाड पडली होती या निष्कर्षावर ब्रिटिश अंमलदार आले होते. स्थानिक श्रेष्ठींच्या पदरी असलेले भाडोत्री अरब सैन्य हे लुटालूट व विध्वंस करीत धुमाकूळ माजवीत होते, यामुळे खानदेशच्या विपदेमध्ये भर पडली होती असेही नव्या राज्यकर्त्यांचे मत बनले असल्याचे ब्रिटिश दप्तरी नोंदींवरून दिसते. आधुनिक इतिहासकारांनी खानदेशच्या स्थितीची ही कारणमीमांसा आजवर जशीच्या तशी स्वीकारलेली आहे. १८२६ साली खानदेशची गाववार माहिती गोळा केलेली दप्तरी नोंदविलेली आहे. आता, तिचा जर बारकाईने अभ्यास केला तर गावे ओसाड पडण्याची




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रक्रिया दुहेरी असल्याचे आढळते. लढायांमध्ये ज्यांचा विध्वंस झाला अशी गावे एका बाजूला आढळतात. १८२६ साली या गावांचे पुनवर्सन व्हावयास आरंभ झाला होता. खानदेशमध्ये नवापूरसारखी अनेक व्यापारी गावे/क्षेत्रे होती. आग्रा ते सुरत या महामार्गावर पडणारा खानदेशचा भाग हा या रस्त्यावरून होणाऱ्या व्यापारी, लष्करी व अन्य वाहतुकीमुळे समृद्ध व गजवजलेला बनला होता. मुघल साम्राज्य मोडीत निघाल्यावर या रस्त्यावरील दळणवळण व व्यापारी वाहतूक विस्कळीत झाली, तिचे प्रमाण कमी कमी होत गेले, तशी या संपूर्ण भागाला आर्थिक विपन्नावस्था प्राप्त झाली. यामुळे रोजगार-व्यवसाय यांच्या शोधात लोकांनी दूरदूरपर्यंत स्थलांतर केल्याने गावे विस्कटली, ओसाड पडली. भरभराटीस असलेल्या व रोजगार-व्यवसायाच्या संधी उपलब्ध असलेल्या परगण्यांमध्ये लोकांनी १८व्या शतकाच्या अखेरीस स्थलांतर केले. या नव्या भरभराटीत आलेल्या क्षेत्रांमधील जी गावे १८०२-०३ च्या काळातील लढायांमुळे ओसाड पडलेली होती त्यांचे पुनर्वसन १८२६ पावेतो जवळपास पूर्ण झाले होते.[५४]

ह्या काळातील शहरांच्या वाढीचे मालेगाव हे एक उत्कृष्ट उदाहरण आहे. १७४० साली मालेगाव हे किल्ला असलेले छोटे गाव होते. इ.स. १८०० पर्यंत माळव्यातून व गुजरातेतून पुण्यास जाणारे रस्ते मालेगावातून जाऊ लागले. १८२६ पर्यंत मालेगावची लोकसंख्या पाच हजाराच्यावर गेली होती. एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीला खानदेशातील २४% लोकसंख्या, २००० पेक्षा जास्त लोकसंख्या असलेल्या गावांमध्ये राहात होती. १२% लोकसंख्या ५००० पेक्षा जास्त लोकसंख्या असलेल्या गावांमध्ये राहात होती.[५५] १८०१ साली फ्रान्समध्ये ११% लोकसंख्या पाच हजारपेक्षा अधिक लोकसंख्या असलेल्या गावांत राहात होती. एक हजार खेड्यांमध्ये महार सोडून एकही बलुतेदार नव्हता. मोठ्या लोकवस्तीची ही गावे केवळ शेतीवर गुजराण करणारी पूर्वीची खेडी – 'प्राचीन परंपरेनुसार' चालणारी 'स्वयंपूर्ण' खेडी – एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीला राहिली नव्हती. दुकानदारी हा या शहरांमधील सर्वांत महत्त्वाचा व्यवसाय होता. शहरांच्या अवतीभोवती असलेल्या खेड्यांमधील शेतकरी स्त्री-पुरुषांना शहरांतील बाजारपेठांमुळे व्यापाराच्या संधी उपलब्ध होत होत्या. अशा स्त्री-पुरुषांचे उत्पन्न, व्यापाराच्या संधी उपलब्ध नसलेल्या व्यक्तींपेक्षा, अधिक व जास्त स्थिर होते.[५६]

अठराव्या शतकात वस्तू-विनिमयासाठी पैशाचा वापर पुष्कळ वाढला होता. फुटकळ खरेदी-विक्री व्यवहारासाठी अनेक वेगवेगळ्या प्रकारची चलनी नाणी प्रचलित होती. १७५० च्या आसपास धारवाड येथील देशपांडे कुटुंबाने टाकसाळ सुरू करून तांब्याची नाणी बाजारात आणायला सुरुवात केली. अशा प्रकारच्या नाण्यांच्या साहाय्याने शेतसारा गोळा करताना अडचणी येत असल्यामुळे, पेशवे सरकारने त्यांना टाकसाळी बंद करण्याचा हुकूम केला. परंतु हा व्यवसाय किफायतशीर असल्यामुळे देशपांड्यांनी तो चालूच ठेवला. शेवटी सरकारला सैनिकी कारवाईची धमकी द्यावी लागली. 'स्वयंपूर्ण' भारतीय खेडे-प्रजासत्ताक प्राचीन काळापासून परंपरागत अस्तित्वात होते हा खास ब्रिटिश साम्राज्यवादी राजवटीने, तिच्या विचारव्यूहात्मक मानसिक-राजकीय गरजेपोटी लावलेला शोध आहे.[५७]

अठराव्या शतकात राज्यसत्तांची महसूल गोळा करण्याची क्षमता वाढली असे म्हणता येणार नाही. थोरल्या माधवरावांच्या कारकीर्दीत पुण्याजवळच्या खेडेगावांचे सर्वेक्षण करून त्यांची करमर्यादा ठरवूनसुद्धा सरकारला संपूर्ण कर गोळा करणे कठीण जात होते. राज्यसत्तेला नेहमीच गावकऱ्यांना चुचकारून आणि अधिक जमीन लागवडीखाली आणूनच अधिक कर मिळविता येत असे. खानदेशसारख्या प्रांतात सरकार वाढीव करांविषयीच्या तक्रारींबाबत विशेष संवेदनशील असल्याचे आढळते. करांची पातळी न वाढवता जादा जमीन लागवडीखाली आणून महसूल वाढवावा अशा सूचना खानदेशातील अधिकाऱ्यांना दिल्या गेल्या होत्या. कर गोळा करण्याची पद्धत शेतकऱ्यांच्या सोईनुसार बदलली जात असे.[५८] धरण बांधून किंवा विहीर खोदून १०० बिघे लागवडीखाली आणणाऱ्या व्यक्तीस १० बिघे जमीन बक्षीस द्यायची पद्धत खानदेशात होती.[५९] शेतकऱ्यांनी नादारीचे कारण दिल्यास शेतसारा माफ करण्यात येत असे.[६०] सरकार तगाईची कर्जेसुद्धा देई.[६१] आणि धरणांची डागडुजी व दुरुस्ती पण करीत असे.[६२] राजकीय कमकुवतपणामुळे महाराष्ट्रातील राज्यसत्तांना विकासावर भर देणाऱ्या राज्यसत्तांसारखे वागणे भाग होते.

येथे उभे केलेले चित्र जर सामान्यतः व्यापक अर्थाने यथातथ्य असेल तर अशी जिवंत, सुदृढ व गतिमान आर्थिक-राजकीय व्यवस्था एका साम्राज्याच्या वसाहतीत रूपांतरित होण्याइतकी दुबळी कशी ठरली, हा प्रश्न उपस्थित होईल. याचे उत्तर आपल्याला तत्कालीन राजकारणाच्या जातकुळीत/

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शैलीत मिळते. आपण असे पाहिले की, स्वतःची सार्वभौम सत्ता टिकविण्यासाठी आणि तिचा विस्तार करण्यासाठी सत्ताधीश घराणे त्याच्या अमलाखालील (किंवा ज्या क्षेत्रावर अंमलाचा विस्तार करण्याची त्याची महत्त्वाकांक्षा असे त्या) क्षेत्रातील सत्ताकांक्षी स्थानिक 'राजकीय उद्योजक' वा पैसा बाळगून असलेले व ते विविध 'प्रकल्पांमध्ये गुंतवून सत्तावान बनू पाहणारे असामी ('portfolio capitalists') यांच्यावर अवलंबून असे. आणि ही मंडळी एकाच वेळी एकाहून अधिक सत्ताधीशांशी संधान बांधून असत. ज्याला सामील झाल्याने वा ज्याची तळी उचलून धरल्याने आपले काम होणार असेल त्याला निष्ठा वाहायला ही मंडळी तयार असत. 'फंदफितुरी' हीच राजकारणाची शैली होती. आणि वरिष्ठ पातळीवरील सार्वभौम सत्ताही अशा आकांक्षी व साधनसंपत्तिवान 'उद्योजक' व्यक्तींच्या फंदफितुरीवर भरवसा ठेवून त्यांचे राजकारण करीत. मुख्य सत्ता (principal) हस्तकांकरवी (agent) आपला कार्यभाग साधत असे, असे आपण पाहिले. मुख्य सत्ता दुबळी पडत आहे असे लक्षात आले की, 'हस्तक' हा त्याची स्वतंत्र सत्ता प्रस्थापित करू पाही. अठराव्या शतकात पेशव्यांची सत्ता प्रस्थापित झाली आणि त्यांनी मराठा राज्याचा विस्तार केला तेव्हा त्यांच्याबरोबर ज्या नव्या कर्तबगार व्यक्ती पुढे आल्या (उदा. दाभाडे, गायकवाड, शिंदे, होळकर इत्यादी) त्यांनी पेशवाईच्या उत्तरार्धापर्यंत स्वतंत्रपणे आपली आपली सत्ता प्रस्थापित केली होती. पेशव्यांना ते जुमानतनासे झाले होते. दुसऱ्या बाजीरावाने या सरदारांकडून येणे असलेल्या रकमा वसूल करून केंद्रीय सत्ता मजबूत करण्याचा प्रयत्न केला तेव्हा या सरदारांनी बंड पुकारले.

अशा बेभरवशाच्या परिस्थितीत आपले प्रभुत्व कायम टिकविण्यासाठी ज्यांना स्थानिक, प्रादेशिक पाळेमुळे नाहीत अशा भाडोत्री सैन्यास ('अरब' वा 'गारदी' या नावाने ओळखल्या गेलेल्या) पदरी बाळगण्याचा उपाय पेशव्यांनी अवलंबलेला दिसतो. पण अशा भाडोत्री सैन्यांचे सरदारदेखील फंदफितुरीच्या तत्कालीन राजकारणात वाकबगार बनलेले होते. कोणाचे हस्तक म्हणून काम केल्याने आपली जास्त धन होणार आहे याचा हिशेब मांडून आपल्या पाठिंब्याचा बाजार मांडून त्यांनी अमाप धन गोळा गेल्याचे आढळते. भाडोत्री अरब, गारदी सैन्यांच्या बेबंद, बेशिस्त वागणुकी-बद्दलच्या तक्रारी या आलोकात विचारात घ्यावयास हव्यात.[६३]

कंपनीला मोबदल्यात मोठ्या रकमा देऊन, वा उत्पन्न देणारा मुलुख तोडून देऊन, ईस्ट इंडिया कंपनीची फौज तैनात करून स्वतःच्या हातात असलेली सत्ता टिकविणे, या मार्गाचा अवलंब एतद्देशीय सत्ताधीशांनी का केला याचा उलगडा आता आपण करू शकतो. सत्तेसाठी राजघराण्यात जी सुंदोपसुंदी चाले वा दरबारी कारस्थाने चालत यात यशस्वी होण्यासाठी इंग्रजांच्या वा फ्रेंचांच्या आश्रयाला जाणे याचीही हीच पार्श्वभूमी होती. या परकीय व्यापारी कंपन्यांना येथे स्वतंत्र सार्वभौम सत्ता स्थापन करण्यात रस नसेल अशी समजूत बाळगलेली होती. आरंभीच्या काळात, फौजा तैनात करण्याने कंपनीला उत्पन्नाचे एक चांगले साधन हाती आल्यासारखे झाले. शिवाय ज्याची पुष्टी आपण करतो त्या राजाकडून आपल्याला नाना सवलती प्राप्त करून घेता येतात हा लाभ होताच.

फंदफितुरीचे राजकारण करून सत्ता काबीज करण्याचा मोह या काळात प्रचंड वाढलेला आपल्याला दिसतो. फंदफितुरीचे राजकारण करणाऱ्या एतद्देशीय राजेरजवाडे, सरदार यांच्या राजकारणात सावधपणे पण हुशारीने 'तैनाती फौजे'चे साधन वापरून, भारतात व्यापार करण्यावरून आपणाशी स्पर्धा करणाऱ्या फ्रेंच कंपनीला शह देण्याचे, तिला येथून हुसकण्याचे राजकारण ईस्ट इंडिया कंपनी खेळत होती. फ्रेंच कंपनीही ईस्ट इंडिया कंपनीच्या विरोधात हेच राजकारण खेळत होती. व्यापारावर प्रभुत्व प्रस्थापित करण्यासाठी फ्रान्स व इंग्लंड यांची त्या काळी अटीतटीची स्पर्धा चाललेली होती. तैनाती फौजेचे संरक्षण एका अंगाने भाडोत्री होते तर दुसऱ्या अंगाने ते येथील लहानमोठ्या सार्वभौम सत्तांना बांधून टाकून अंकित करण्याचे राजकारण होते. या स्पर्धेत फ्रेंचांचा पराभव झाला तेव्हा ब्रिटिशांची – म्हणजे ईस्ट इंडिया कंपनीची – अधिसत्ता येथील लहानमोठ्या सार्वभौम सत्तांवर निरंकुश स्वरूपात प्रस्थापित झाली.

येथील व्यापारी-सावकार, व्यापारी पेढ्या, निम-स्वायत्त जहागिरदार, सरदार हे स्वातंत्र्य-पारतंत्र्य या चौकटीत विचार करीत नव्हते. दुसऱ्या बाजीरावाच्या लोभी व 'लुटारू' वृत्तीशी वा त्यांना पूर्णपणे अंकित करण्याच्या बाजीरावाच्या धोरणाशी तुलना करता कंपनीबहादूर सत्ता पेशव्यांच्या वरचढ ठरणे ही गोष्ट त्यांना मानवणारी वाटली. कारण एव्हाना व्यापारी-सावकारांचे कंपनीशीही आर्थिक व्यवहार वाढले होते. सैनिकी मोहिमांसाठी कंपनीलाही ते पैसे कर्जाऊ देऊ लागले होते.







अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कंपनीमार्फत जो व्यापार चालत असे त्याचेही महत्त्व एव्हाना वाढले होते. अनेक देशी पेढ्या कंपनीचा पैसा इकडून-तिकडे पोचता करण्याचे काम करीत. थोडक्यात, कंपनीचे राजकीय प्रभुत्व प्रस्थापित होणे वेगवेगळ्या कारणांनी ह्यांच्या पथ्यावरच पडणारे होते. जहागिरदार, सरदार, छोटे राजेरजवाडे यांच्या दृष्टीने वरिष्ठ पातळीवर ईस्ट इंडिया कंपनीची राजकीय सत्ता प्रस्थापित होणे म्हणजे एका संरक्षक कवचाचा लाभ होण्यासारखेच होते. कारण त्यांच्या राजकीय सत्तेला धक्का न लावण्याची वा त्यांच्या कारभारात हस्तक्षेप न करण्याची खबरदारी कंपनीचे अधिकारी घेत.

एकोणिसाव्या शतकाच्या दुसऱ्या दशकापावेतो भारत-भरच्या सार्वभौम राज्यसत्ता – थेट मुघल बादशाहीसकट – कंपनीच्या संरक्षक कवचात बंदिस्त व अंकित झाल्या होत्या. आपल्यापेक्षा वरिष्ठ पातळीवर असलेल्या, एकाहून अधिक सार्वभौम सत्तांच्या आपापसातील सत्तास्पर्धेचा वा अंतर्गत सुंदोपसुंदीचा फायदा उठवून स्वतःच्या सत्तेचा विस्तार करण्याचे वा स्वतःच सार्वभौम बनण्याचे राजकारण यानंतर अशक्य बनले. सर्वोच्च एकमेव सार्वभौम सत्ता कंपनीच्या हाती एकवटली आहे अशी स्थिती निर्माण झाली. फंदफितुरीच्या राजकारणाचाच बेरकीपणे व कुशलतेने लाभ उठवून कंपनी सार्वभौम सत्ताधीश बनली होती.[६४] पण आता राजकारणाच्या या शैलीचा अवलंब करणे 'भ्रष्ट' व 'अनीतिमान' म्हणून इंग्रज अंमलदारांच्या लेखी बदनाम ठरू लागले. आपण जेते आहोत, प्रगत व प्रबुद्ध आहोत, नैतिकदृष्ट्या श्रेष्ठ आहोत आणि आपण येथे सार्वभौम सत्ताधीश असावे हे योग्यच घडले आहे, असा अहंकार इंग्रज अंमलदारांमध्ये रुजला-मुरला आणि त्यांच्या लेखनातून प्रकट होऊ लागला. नव्या राजकीय व्यवस्थेखाली एतद्देशीयांमधील महत्त्वाकांक्षी, कर्तबगार, साहसी व उपक्रमशील व्यक्तींना स्वतःजवळील साधनसंपत्ती वापरून सत्तासंपादनाचे राजकारण करण्यास अवकाश उरला नाही. मग या कालच्या राजकारणी 'भांडवलदार-उद्योजक' मंडळींचे रूपांतर इनामदार, जहागीरदार-जमीनदार, संस्थानिक नावाच्या, पेंढा भरलेल्या प्राणि-संग्रहालयातील अभिजनवर्गीयांमध्ये झाले. अनेक पेन्शनीत निघाले. काही समूळ नष्ट केले गेले. एतद्देशीय साधन-संपत्तिवान साहसी आकांक्षी व्यक्तींच्या राजकीय स्पर्धेला कोणताही वाव नसलेली निरंकुश प्रशासनस्वरूपी नोकरशाही राज्यसत्ता प्रस्थापित झाली.

**भाग दुसरा**

या भागात आपण महाराष्ट्रातील राजकीय आणि आर्थिक व्यवस्थेची १८१८ ते १९४७ या कालखंडातील वाटचाल तपासून बघणार आहोत. ब्रिटिश सत्तेचा सर्वांत महत्त्वाचा आणि प्राथमिक परिणाम म्हणून जुन्या राजकीय व्यवस्थेच्या नाशाकडे बोट दाखविता येईल. जुन्या व्यवस्थेतील राजकीय उद्योजक आणि 'बहुपदरी भांडवलदार' (Portfolio Capitalists) ह्यांच्यावर ह्या घटनेचे दूरगामी परिणाम झाले. येथे आपण निंबाळकर-वाठारकर कुटुंबाचे उदाहरण बघूया.

लंडनमधील ब्रिटिश लायब्ररी येथील *इंडिया अँड ओरिएंटल कलेक्शन्स*मधील नोंदीप्रमाणे, "मराठा राजेरज-वाड्यांच्याकडे चाकरी करून या कुटुंबांपैकी काहींनी अमाप संपत्ती गोळा केली. देशपांडे या हुद्द्यावर काहीजण काम करीत होते तर काही कर्जे पुरवीत असत. या मार्गांनी त्यांनी पैसा कमावला. त्यांच्या काही मुलांनी बराच पैसा उधळला. जगदेवराव यांचा अपवाद म्हणता येईल. शिंदे यांच्याकडे आता ते सरदार (leader of Horse) म्हणून पदरी आहेत. यांचा अपवाद वगळता, या कुटुंबातील बाकी सर्वजण बेकारच आहेत, आणि ते कर्जबाजारीही आहेत. आणि ते कर्जफेड करू शकलेले नाहीत."[६५] नाईक-निंबाळकरांचे दारिद्र्य हे त्यांच्या कुटुंबियांच्या 'उधळपट्टी'चा परिणाम आहे, असा ब्रिटिश प्रशासकांचा निवाडा होता.

यांच्यासारख्या त्या काळातील बड्या धेंडांचा व त्यांचा उत्कर्ष घडवून आणणाऱ्या राजकारणाचा ऱ्हास यामुळे आर्थिक वाढीला खीळ बसली. पैसा गुंतवून आपले स्थान व सत्ता यात भर टाकत राह्यची, यासाठी इतरांशी अनुसंधान जोडायचे याला नव्या राजवटीत काही अर्थ उरला नाही. गिर्जोजी आणि १८ व्या शतकातील त्याचे वारसदार यांनी जे प्रचंड भांडवल गुंतवले होते ते एका फटक्यात अप्रस्तुत ठरले. ब्रिटिश राजवट प्रस्थापित होण्यापूर्वीच्या राजकीय व्यवस्थेखाली भांडवल-संचयाच्या, सर्वांत जास्त पैका मिळवून देणाऱ्या या वाटा नव्या जमान्यात बंद झाल्या.

१८व्या शतकात सामाजिक-आर्थिक चलनवलनाचे प्रमाण व्यापक व विस्तृत होते ते संपुष्टात आले. अठराव्या शतकातील एक मोठे सावकार गद्रे यांच्यावर १८१८ नंतर दिवाळखोरीची वेळ आली, तर सरदार तुळशीबागवाले ह्यांनाही मोठ्या प्रमाणात आर्थिक अडचण भासू लागली. ब्रिटिश राजवट प्रस्थापित


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

झाल्यावर श्रमिक-कारागीरांच्या विरोधात नव्या राज्यकर्त्यांनी स्थानिक भांडवलदारांची पुष्टी केली आणि त्यामुळे ब्रिटिश राजवट प्रस्थापित होण्यापूर्वी भांडवलदारांना ज्या प्रमाणात भांडवल-गुंतवणूक करणे भाग पडत होते त्या प्रमाणात भांडवल-गुंतवणूक करणे गरजेचे राहिले नाही; श्रमिक-कारागीरांच्या विरोधात त्यांच्याशी सौदा करण्याच्या बाबतीत वसाहतवादी राजवटीने भांडवलदारांचे बळ वाढविल्यामुळे भांडवलदारांची भांडवलाची बचत होऊ लागली (म्हणजे कमी भांडवलात त्यांचे काम होऊ लागले), असा पार्थसारथी यांच्या प्रतिपादनाचा अर्थ.[६६] पण मग पार्थसारथींना असे दाखवून द्यावे लागेल की ज्यांच्याजवळ पैसा होता त्यांनी ना तो गुंतवला ना उपभोगांवर तो खर्च केला; तो त्यांनी केवळ न वापरता स्वतःपाशी ठेवून दिला; म्हणजेच, आर्थिक व्यवहारामधून तेवढ्या पैशाची गळती झाली. माझे म्हणणे असे आहे की, ब्रिटिशांनी भांडवलदारांची पुष्टी केली म्हणून नव्हे तर नव्या, बदललेल्या राजकीय संदर्भात राजकारणात या मंडळींनी केलेली प्रचंड भांडवली गुंतवणूक फुकट गेली, आणि मोठा लाभ पदरात टाकणारे गुंतवणुकीचे मार्ग बंद झाले म्हणून संचयित भांडवल आणि भांडवलसंचयाचे दर दोन्हींमध्ये घट झाली. गिर्जोजी जाधवा-सारख्या व्यक्तींनी राजकीय सत्ता (वतने, पदे यांवर हक्क प्रस्थापित करून) प्राप्त करून घेण्यासाठी मोठी भांडवल गुंतवणूक तर केली होतीच पण आपण केलेल्या गुंतवणुकीचे मोल राखण्यामध्येही आवश्यक ती भांडवल गुंतवणूक केली होती हे यासिनखानला दिलेल्या वागणुकीवरून दिसून येते.

भांडवलाचा कमी झालेला साठा व एकूणच अर्थ-व्यवस्थेतील उत्पन्न व खर्च यांच्या पातळीत झालेली घट आपल्याला सर्वसामान्यांच्या आर्थिक अडचणींमध्ये प्रतिबिंबित झालेली दिसते. १८१८ नंतर पुण्यातील एका रविवार पेठेमधल्या ५५% पेक्षा जास्त कुटुंबप्रमुखांना, पेशवाईतील चाकरी सुटल्यामुळे त्यांची अवस्था बेकार झाली आहे म्हणून, नव्या ब्रिटिश शासनाने घरपट्टी माफ केली होती.[६७]

१८१९ ते १८३० ह्या कालखंडात रविवार पेठेतल्या राहत्या घरांची (कुटुंबांची) संख्या १३७५ वरून ६६६ पर्यंत खाली आली.[६८] दख्खनचा रेव्हेन्यू कमिशनर विल्यम चॅपलिन १८२२ साली लिहितो... "राज्य एतद्देशीयांच्या हातून परकीयांच्या हाती गेल्यावर त्याचा परिणाम सावकारांची परिस्थिती खालावण्यात झालेला आहे. पतपुरवठ्याच्या व्यवहारांमध्ये (बँकिंग) पूर्वी जेवढे भांडवल वापरले जात होते त्याच्या २/३ देखील भांडवल आता ह्या व्यवहारात वापरले जात नाही. ही खालावलेली परिस्थिती जास्त करून पुण्याबाबतीत आणि दख्खनमधील इतर काही प्रमुख शहरांच्या बाबतीत जास्त खरी आहे. पुणे आता मराठा सत्तेच्या राजधानीचे शहर राहिलेले नाही, येथे आता प्रमुख दरबारी मानकरी वास करीत नाहीत."[६९]

राज्यसत्तेतील बदलाचे परिणाम फक्त पुण्यापर्यंतच मर्यादित नव्हते, ते सर्व दख्खनभर आढळत होते, आणि केवळ प्रमुख शहरांमध्ये आढळत होते असे नाही.

१८२१ मध्ये बागलकोटच्या परिस्थितीबद्दल मार्शलने लिहिले आहे की, "बाजारपेठ अगदी ठप्प झाली आहे... दसऱ्याच्या वेळी सर्व श्रीमंत व सरदार मराठेमंडळी एकमेकांना उंची व तलम कापडचोपडाच्या भेटी देत असतात. एका दसऱ्याच्या दिवसामध्ये ५०,००० रुपयांहून अधिक किंमतीची तलम व उंची कापडाची विक्री होत असे, असे ऐकण्यात येते. दरबाराकडून आणि लष्करातील मंडळींकडून दर वर्षी पितळ व तांबे यांची दोन हजार भांडी विकत घेतली जात असत. यांपैकी काही येथेच तयार होत असत तर बरीचशी मुख्यत्वेकरून अहमदनगरवरून आयात केली जात. ही सर्व खरेदी श्रेष्ठीमंडळींकडून केली जात असे. राज्य गमावल्यानंतर, १८२१ सालची स्थिती अशी की, या श्रेष्ठी मराठा-मंडळींची गाठ पडत नाही; हा वर्ग जवळपास नामशेषच झाला आहे."[७०] मराठा स्वराज्यात ज्या प्रचंड प्रमाणावर सारा गोळा होत असे त्याचे फेरवाटप दख्खनमधील लोकांमध्ये होणे थांबल्यामुळे पूर्वीच्या सरदार-दरकदार मंडळींची रया पार गेली होती. त्यामुळे दख्खनमध्ये आयात बव्हंशी बंदच झालेली होती. खुद्द दख्खनमध्ये फारच थोड्या वस्तूंचे उत्पादन होत असे. अठराव्या शतकामध्ये पैसा पुष्कळ असल्याने वेगवेगळ्या उच्च प्रतीच्या मालाची आयात दख्खनला बाहेरून होऊ लागली. आणि त्यामुळे त्याच मालाचे स्थानिक उत्पादन बंदच पडल्यासारखे झाले. बाजारात विक्रीसाठी माल येण्याचे प्रमाण कमी झाले आणि माल विकत घेणारे लोकही नसल्याने बाजारपेठ ठप्प झाली.

जुन्या राजकीय व आर्थिक व्यवस्थेच्या ऱ्हासाबरोबरच १८२३ नंतर महाराष्ट्रात शेतमालाच्या किंमतीत प्रचंड मंदी सुरू झाली. लेखाच्या शेवटी तक्ता क्रमांक एकमध्ये इंदापूर



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

येथील १८०९ ते १८६६ ह्या कालखंडातील ज्वारीच्या किंमती उदाहरणादाखल दिलेल्या आहेत. अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात ज्वारीच्या किमती सतत हळूहळू वाढत होत्या. १८२३ नंतर मात्र त्या कोसळायला सुरुवात झाली.

ह्याच दरम्यान शेतीवरील कराचा वास्तविक बोजा झपाट्याने वाढत गेला. मराठ्यांच्या अंमलात आर्थिक व सामाजिक चलनवलन व्यापक स्वरूपात घडून आले, सरंजामदार वर्गाचा उत्कर्ष झाला. मात्र सत्तासंपादनासाठी संगनमताने फंदफितुरीचे राजकारण वाढले तेव्हा राज्याच्या तिजोरीत — पुण्याला — महसूल गोळा होण्याचा ओघ कमी झाला. राज्याचे महसुलाचे उत्पन्न वाढविण्याचे दुसऱ्या बाजीरावाने प्रयत्न केले. त्यामुळे तो नावडता झाला आणि त्याचा पक्ष सोडून जाणाऱ्यांची संख्या वाढली. पण महसुलाच्या उत्पन्नात फारशी भर पडली नाही. आता नवीन इंग्रज सरकारला जुन्या राज्यसत्तांसारखा, वेगवेगळ्या शक्तींचा समतोल साधण्याचे काही कारण नव्हते. पेशवाईच्या पाडावानंतर मुंबई इलाखा आर्थिकदृष्ट्या तुटीचा ठरू लागल्याबरोबर शेतसाऱ्याची पातळी एकदम वाढवली गेली. राजकीय बलाबलाप्रमाणे होणारे महसुलाचे पुनर्विभाजन नवीन राज्यसत्तेच्या दृष्टीने भ्रष्टाचाराचे द्योतक होते. इंग्रज सरकारच्या मते भारतातील राज्यसत्तांचे अधिकार अस्मानी-सुलतानी, म्हणजे अमर्याद होते. स्वतःचे प्रबुद्ध पुढारलेपण इंग्रज राज्यकर्त्यांनी अर्थातच गृहीत धरलेले होते. इंग्रज सरकारच्या कल्पनेनुसार भारतीय राज्यसत्ता सर्व शेतजमिनीची सार्वभौम मालक होती. त्यामुळे सर्व जमीनदार ही कुळे ठरली. अठराव्या शतकात पैसा गुंतवून सत्तासंपादनाचे राजकारण करणारे, अनेक 'ठिकाणी' गुंतवणूक करणारे जे भांडवलदार (portfolio capitalists) होते त्यांच्या राजकीय बळाचे स्रोत, त्यांची वतने व ज्यांवर ते हक्क प्रस्थापित करू शकत असतील ती सत्ता-पदे असत. या पदांना कोणताच अर्थ वा वजन सत्तासंपादनाच्या राजकारणाच्या संदर्भात राहिला नाही.[७१] सत्ता हाती आल्यावर थोड्याच अवधीत महसूल गोळा करण्याच्या यंत्रणेतील बारकावे, स्थानिक हक्क यांची — म्हणजे कोणाच्या खिशात किती सारा जातो, आणि त्याला खरोखर काही हक्क पोचतो का याची — कसून चौकशी सुरू झाली. सरकारला शक्य असेल तेवढा जास्तीत जास्त कर गोळा करणे हे नव्या राजवटीचे धोरण बनले. करांचा वास्तविक स्वरूपातला बोजा ह्या कालखंडात दुपटीने वाढला असा अंदाज सुमित गुहा ह्यांनी केलेला आहे.[७२] दक्षिण दख्खनचे रेव्हेन्यू कमिशनर सिम्पसन यांनी १८४२ साली त्यांच्या वरिष्ठांना लिहिले, 'शेती करणाऱ्या वर्गाच्या कमालीच्या हलाखीबद्दल सर्वजण बराच काळ बोलत आले आहेत. माझे यासंबंधीचे मत बाजूला ठेवून मी असे म्हणेन की, या मुद्यावर ज्यांना अधिकारवाणीने बोलण्याचा अधिकार आहे अशा जवळपास प्रत्येक अधिकाऱ्याच्या मते, कमीअधिक प्रमाणात अतिरेकी सारा आकारणीचा हा परिणाम होय."[७३] ह्या कारणाने ह्या काळात मोठ्या प्रमाणावर कसणुकीखालील जमिनीच्या क्षेत्रामध्ये, खानदेश आणि काही मर्यादेपर्यंत अहमदनगर जिल्ह्यांचा अपवाद वगळता, वाढ झाली नाही. कधीही कसणुकीखाली न आलेल्या विस्तीर्ण जमिनी अस्तित्वात असूनही हे घडले.[७४]

ह्या काळापावेतो, ब्रिटिश राजवट आणि त्या राजवटीशी संलग्न अशी अवरुद्ध अवस्था यामुळे, भारताचे आर्थिकदृष्ट्या मागासलेपण 'आधुनिकते'च्या अभावी निर्माण झाले असल्याची समज रुजली. इंग्लिश माणसांच्या मनोवृत्तींचा, धारणांचा आणि यंत्रांच्या आधारे केल्या जाणाऱ्या उत्पादनांचा अभाव असा आधुनिकतेच्या अभावाचा अर्थ दख्खनमधील नव्याने उदयास आलेल्या बुद्धिजीवींच्या मनात खोलवर रुजला. अठराव्या शतकातल्या ब्रिटिश प्राच्यविद्यापंडितांनी भारतीय प्राचीन संस्कृतीची मुळे प्राचीन युरोपियन संस्कृतीमध्ये पाहावयास सुरुवात केली होती. हेस्टिंग्जचे हेतू काही व्यावहारिक होते आणि काही विद्याअभिवृद्धीशी संबंधित होते. एव्हाना, त्याच्या प्रयत्नांमुळे, प्राच्यविद्यापंडितांनी प्राचीन भारतीय ग्रंथ म्हणून ज्या ग्रंथांना मान्यता प्रदान केली होती त्यांना प्रामाण्य व प्रतिष्ठा बहाल केली गेली होती. प्राचीन वैभवशाली अभिजात भारतीय संस्कृती तिच्या खऱ्या स्वरूपात या ग्रंथांमध्ये ग्रथित झालेली आढळते अशी मान्यता होती. भारतीय समाजातला सर्वात वरचढ घटक हा ब्राह्मण जाती हा होय, आणि ब्राह्मणांची भारतीय समाजाबाबतची मते ही योग्य होत, ही धारणा रुजायला यामुळे प्रोत्साहनच मिळाले.

राजकीय सत्तेच्या स्पर्धकांमधील बलाबलाचा बदलणारा तोल आपल्याला अनुकूल करून घेण्याच्या कर्त्या राजकारणी पुरुषांच्या प्रयत्नांतून स्थानिक रीतिरिवाजांची जी गुंतागुंत उत्पन्न झाली तिच्याकडे, तत्कालीन काळाच्या दबावाखाली फोफावलेला भ्रष्टाचार म्हणून पाहिले गेले. भारताचा जो वास्तविक ऐतिहासिक अनुभव त्याचे असे पुरते अवमूल्यन



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

केले गेले. अठराव्या शतकाच्या शेवटच्या दशकांमध्ये 'ओरिएंटल डेस्पॉटिझम'ची ('पौर्वात्य अस्मानीसुल्तानी') एक संकल्पना मनावर स्वार झालेली होती, आणि तिच्या आलोकातून सगळी बौद्धिक मांडणी केली जात होती.[७५]

प्राचीन काळी भारत हा एक प्रगत, प्रगल्भ, उच्च संस्कृती असलेला देश होता; आज मात्र तो कमालीचा अधःपतित असा एक समाज आहे, हा जवळपास अधिकृत, शिष्टमान्य निवाडा केला गेला. भरीला, भारत आणि युरोप यांचा प्राचीन भूतकाळ सामाईक होता; पण पुढच्या काळात इंग्लंड सतत प्रगती करीत गेला तर भारत जिथल्या तिथेच अवरुद्ध अवस्थेत तरी राहिला वा अधःपतित होत गेला, अशी इतिहासाची मांडणी केली जाऊ लागली. नव्याने उत्कर्ष पावत असलेल्या दख्खनमधील एतद्देशीय बुद्धिजीवी वर्गाने ही विचारधारा आत्मसात केली, अंगिकारिली.

प्राचीन धर्मशास्त्रविषयक ग्रंथांमध्ये बालविवाह व विधवाविवाह यांना मान्यता/प्रामाण्य प्राप्त असल्याचे आढळते का, शास्त्रवचने काय सांगतात यावरून १९व्या शतकाच्या उत्तरार्धामध्ये वादविवाद झडले. प्राचीन काळी भारतीय संस्कृती तिच्या मूळ, अस्सल स्वरूपात आढळते ही धारणाच या वादविवादांमध्ये प्रतिबिंबित होत होती. अर्थशास्त्रावरील ('पोलिटिकल इकॉनॉमी') क्लिफ्ट यांच्या क्रमिक पुस्तकाच्या आधारे लोकहितवादींनी *लक्ष्मीज्ञान* हा ग्रंथ रचला. ज्ञानसाधनेची थोर परंपरा भारतामध्ये प्राचीन काळी आढळत असली तरी, गेल्या ३००० वर्षांच्या काळात भारतीयांची ज्ञानसंपादनाची ऊर्मी नष्ट झाली असल्याचे लोकहितवादींनी त्या ग्रंथात मत मांडले.[७६] अर्थशास्त्राची एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धातील क्रमिक पुस्तके ब्रिटिश अनुभवावर बव्हंशी अवलंबून होती. १८व्या शतकातील दख्खनपेक्षा तिकडील राजकीय-आर्थिक परिस्थिती व संदर्भ अगदी वेगळे होते.

युरोपियन अनुभवविश्वाच्या आधारे तयार झालेल्या पुस्तकांनुसार येथील अर्थव्यवस्था मागासलेली वाटणे साहजिकच होते. एकोणिसाव्या शतकातील एतद्देशीय विचारवंतांना अठराव्या शतकातील लवचिक आणि गतिशील राजकीय-अर्थव्यवस्थेचा संदर्भ नव्हता. एकीकडे त्यांना भारतातील दारिद्र्य आणि ढासळलेल्या स्थितीतली अर्थव्यवस्था दिसत होती तर दुसरीकडे औद्योगिक-क्रांतिकाळातील इंग्लंड दिसत होते. त्यातच एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात भारत हा प्रामुख्याने तयार मालाची निर्यात व सोनेचांदीची आयात करणाऱ्या राष्ट्रापासून तयार मालाची आयात व कच्च्या मालाची निर्यात करणारा देश झाला होता. तत्कालीन परिस्थितीत भारत जरी खरोखरच मागासलेला वाटत असला तरी, एका विशिष्ट सांस्कृतिक व्यवस्थेमुळे हे मागासलेपण आले होते, असे म्हणणे योग्य ठरणार नाही. लोकहितवादींच्या मते येथील कर्मकांडे, लोकांचा स्वार्थीपणा व अविचार, आळस, पारतंत्र्यात पडण्याची उपजत प्रवृत्ती इत्यादी गोष्टी येथील मागासलेपणास कारणीभूत होत्या.[७७] एकोणिसाव्या शतकातील राजकीय व वैचारिक गरजेप्रमाणे अठराव्या शतकाची व एकूणच महाराष्ट्राच्या इतिहासाची वेगवेगळी चित्रे उभी केली गेली. उदा., एकोणिसाव्या शतकातील सामाजिक विषमता व शेतकऱ्याची आर्थिक विवंचना ह्यांच्या विरुद्ध जोतिबा फुल्यांना लढा उभारायचा होता. 'कुणबी राजा शिवाजी' ह्याचे ऐतिहासिक मिथक फुल्यांना सोईचे होते. आजच्या विषमतेची मुळे ही कुणबी राजाकडून कपटाने राज्य हस्तगत करणाऱ्या अठराव्या शतकातील ब्राह्मण पेशवाईत सापडतात, असे ऐतिहासिक मॉडेल फुल्यांनी मांडले. दुर्दैवाने फुल्यांचे मॉडेल मिथक म्हणून न घेता वास्तविक इतिहासाचे वर्णन म्हणून घेतल्यामुळे ब्राह्मण-ब्राह्मणेतर द्वेष वाढतच राहिला. या काळात एकेका जातीची 'अस्सल' (essential) स्वभाव-प्रवृत्ती व चरित्र निर्धारित केले गेले आणि त्याचा हवाला देऊन पुढचे बरेचसे वाद झडत राहिले. (इंग्रजी चर्चाविश्वात या प्रक्रियेला उद्देशून 'essentialisation' ही संज्ञा वापरली जाते.) व्यक्ती व समूह हे त्यांच्या विशिष्ट परिस्थितीनुसार स्वतःचे हितसंबंध जपण्यासाठी/स्वार्थ साधण्यासाठी उपयोगी अशा साधनांचा बुद्धिनिष्ठ वापर करीत नाहीत; तर ते त्यांच्या जाती व वर्ण यांच्या स्वभावप्रकृतिधर्मानुसारच वागतात, असे ठाम गृहीतकृत्य आढळते.

अठराव्या शतकातील राजकारणाचा असा अर्थ लावता येत नाही, हे आपण पहिल्या भागात पाहिलेच आहे. अठराव्या शतकातील जातिव्यवस्थेचा 'अर्थ' राजकीय सोईप्रमाणे लावला जात असे आणि जातिधिष्ठित स्थानिक व्यवहारांच्या मागे व्यक्तींच्या राजकीय बलाबलाचा बदलता तोल लपलेला असे, हेही आपण पहिल्या भागात पाहिले आहे. परंतु हा राजकीय संदर्भ नष्ट झाल्यावर एकोणिसाव्या शतकातील विचारवंतांना फक्त जाती व त्यांच्या स्वभावप्रकृतीच दिसत होत्या. त्यामुळे अशा प्रकारचे essentialisation केले जाणे अटळ होते.









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

इंग्लंडच्या नमुन्यावरहुकूम दख्खनचे आधुनिकीकरण होऊ शकले नाही याचे कारण येथील समाजाची बौद्धिक, नैतिक व आर्थिक अंगांनी असलेली अध:पतित व रोगट अवस्था, असा निष्कर्ष येथील बुद्धिवंतांनी काढला. लोकहितवादी हे एकोणिसाव्या शतकात उत्पन्न झालेल्या सामाजिक सुधारणा चळवळीच्या अग्रभागी होते. वस्तू उत्पादना-साठी यंत्रांचा व आधुनिक तंत्रविज्ञानाचा वापर येथे केला जात नव्हता, हेही एक येथील अर्थव्यवस्थेच्या मागास असण्याचे व कायम राहण्याचे स्पष्टीकरण दिले गेले.[७८] (आजचे इर्फान हवीब यांच्यासारखे इतिहासकार व प्रा. रा.भा. पाटणकर यांच्यासारखे अभ्यासक हीच उपपत्ती सादर करीत असतात.)

आता आपण एकोणिसाव्या शतकातील आर्थिक वदलांकडे पुन्हा वळूया. १८५० पर्यंत इंग्रजी राजवटीखालील महसूल आकारणी व वसुली यांचा विध्वंसक आघात अधिकारी वर्गाच्या लक्षात येऊ लागला होता. गोल्डस्मिथ-विन्गेट यांच्या सर्वेक्षणानुसार मुंबई इलाख्यातील शेतसारा बऱ्याच प्रमाणात खाली आणण्यात आला आणि कमी साऱ्याची हमी तीस वर्षांसाठी देण्यात आली. ह्याच सुमारास दळणवळणाच्या सोईंचा प्रसार होऊ लागला आणि वेगवेगळ्या बाजारपेठा एकमेकींशी अधिक चांगल्या पद्धतीने जोडल्या गेल्या. लागवडीखालील जमिनीत झपाट्याने वाढ झाली. सुमित गुहा यांच्या मते १८८० पर्यंत सर्व उपजाऊ जमीन लागवडी-खाली आणण्यात आली.[७९] शेतमालाच्या किंमतीसुद्धा वाढू लागल्या. ह्या काळात शेतकऱ्यांकडून ग्रामीण अर्थव्यवस्थेला होणारा पतपुरवठा वाढला होता, असे मत चार्ल्सवर्थ यांनी मांडले आहे. शेतकरीच आपापसात कर्जाऊ पैसे देत-घेत असत, आणि यामुळे पतपुरवठ्यात वाढ झाली असे त्यांचे निरीक्षण आहे.[८०] कमी प्रतीच्या जमिनी व चराऊ कुरणांचे शेतीत रूपांतर करून शेतीचा विस्तार झाल्यामुळे, पशुधनाचे शेतजमिनीशी प्रमाण कमी होत होते, असे गुहा मानतात. पशुधन कमी झाल्यामुळे जमिनींना शेणखताचा पुरवठाही कमी झाला.[८१] या काळात शेतीखालील क्षेत्रात मोठी वाढ झाली. याचाच अर्थ असा की, मोठ्या प्रमाणावर संसाधने गोळा केली जाऊन व्यक्ती त्यांची अधिक उत्पादक गुंतवणूक करीत होत्या. लोकसंख्येचा दबाव वाढत गेल्यामुळे मोलाने मजुरी करणाऱ्यांचे प्रमाण वाढत चालले होते. ह्या काळात शेतमजुरांना मागणी वाढली असे मानले जाते. पण शेतमजुरांच्या मजुरीच्या वास्तविक दरात महाराष्ट्रपातळीवर वाढ झाली नाही. पुण्याच्या परिसरात तर मजुरीचे वास्तविक दर कमीच झाले.[८२] अहमदनगर जिल्ह्यात किटिंग ह्याने गोळा केलेली वास्तविक मजुरीची आकडेवारी मजुरीचा वास्तविक दर खालीवर होताना दाखविते; परंतु दीर्घकालीन वाढ दाखवत नाही.[८३] १८५०-१९०० या काळात शेती क्षेत्राचे जे व्यापारीकरण झाले त्यामुळे व्यापक प्रमाणावर शेतकऱ्यांची भरभराट घडून आली; या भरभराटलेल्या थराखाली मात्र एक ठळकपणे दरिद्री असलेला एक अल्पसंख्यक वर्ग होता, असा चार्ल्सवर्थ यांचा अभिप्राय आहे.[८४]

ह्या काळात कापूस, ऊस आणि भुईमूग ह्या नगदी पिकांसाठी मागणी वेगाने वाढली. कापूस हे दख्खनमधील सर्वात महत्त्वाचे निर्यातीचे नगदी पीक होते. उत्तर दख्खनमध्ये खानदेश आणि नाशिक, पूर्व दख्खनमध्ये विजापूर तर दक्षिणेत धारवाड आणि बेळगाव भागात कापूस घेतला जात असे. कापसाची आंतरराष्ट्रीय मागणी वाढल्यावर कापसाखालील जमीन, तसेच दर एकरी उत्पादन वाढू लागले. Neglectum Bengalensis ही कापसाची नवीन जात प्रचलित झाली. ह्या आखुड धाग्याच्या जाडाभरड्या नवीन जातीची पैदास मुख्यतः, अधिकाधिक फायदा मिळविण्याचा प्रयत्न करणाऱ्या शेतकऱ्यांनी केला. "I had some trouble finding out how Khandesh became overrun by an inferior kind of cotton... a few years ago, a Marwaree named Seewalall Kissandas, a resident of Paldi, brought a large quantity of Malwa cotton seed and sold it to the ryots of the surrounding villages, who, finding it yielded a larger quantity, though of much inferior quality than that formerly grown, generally adopted it and it has now become the most prevailing staple in the province."[८५]

ह्या प्रजातीच्या प्रसाराला ब्रिटिश सरकारच्या हस्तक्षेपाने खीळ बसली. १८६५-६६ पासून सरकारने, शेतकऱ्यांनी खानदेश मिक्चर न लावता वऱ्हाडी बाणच पेरावा म्हणून शेतकऱ्यांवर नाना प्रकारे दबाव आणला. हा हस्तक्षेप १८८२ मध्ये कापूसखाते बंद होईपर्यंत टिकला. १९४२ पर्यंत खानदेशात कापसाचे दर एकरी उत्पादन वाढत गेले. दर एकरी उत्पादनवाढीमागे कापसाच्या नवीन जाती आणि लागवडीच्या पद्धतीतील सुधारणा


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ही प्रमुख कारणे होती. दख्खनच्या इतर भागात मात्र कापसाच्या उत्पादकतेमधील वाढ कायम ठेवता आली नाही. १९२० ते १९३० ह्या काळात दख्खनच्या इतर भागांत कापसाची उत्पादकता घटली.

दख्खनमध्ये उसाखाली फार मोठ्या प्रमाणात जमीन कधीच नव्हती. १८८६ ते १९४० च्या दरम्यान ४० ते ७० हजार एकर क्षेत्र उसाखाली होते. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस उसाचे दर एकरी उत्पादन बरेच वाढले होते. वाढीव उत्पादकता सर्वात प्रथम पुणे जिल्ह्यातील कालव्यांच्या भागात, शेतकऱ्यांनी स्वतःच विकसित केलेल्या लागवडीच्या पद्धतीने मिळविली होती. सरकारी शेती विभागाचे संशोधन त्यामानाने बऱ्याच उशीराची गोष्ट आहे. शेतकऱ्यांनी विकसित केलेल्या तंत्रज्ञानाचा एक महत्त्वाचा भाग पाणी व खताचा जास्त वापर हा होता. दळणवळणातील सुविधांमुळे अमोनियम सल्फेट आणि Pouderette हे पुण्याच्या सांडपाण्यापासून तयार केलेले खत लागवडीखालील क्षेत्रापर्यंत वाहून नेण्यास निश्चित मदत झाली. जुन्या पद्धतीच्या लाकडी चरकांच्याऐवजी लोखंडाचे चरक वापरल्यामुळे सुद्धा उसापासून मिळणाऱ्या दर एकरी उत्पन्नात वाढ झाली. ह्या नवीन तंत्रज्ञानाच्या किफायतशीरपणाची खात्री पटल्यावर त्याचा प्रसार नवीन कालव्याखालील क्षेत्रांमध्ये झपाट्याने झाला. पाणी व खताचा जादा वापर करण्याच्या तंत्रज्ञानामुळे जमिनीचे क्षारीकरण व पाणी तुंबण्याच्या समस्या निर्माण झाल्या. दर एकरी पिकाचे प्रमाण कमी होऊ लागले. त्याचवेळेस शेतमालाचे भाव कमी होऊ लागल्यामुळे परिस्थिती आणखीनच गंभीर झाली.

धान्यपिकांच्या बाबतीत मात्र दर एकरी उत्पादनात वाढ झाली नाही. १९०० ते १९४७ ह्या काळात दर एकरी उत्पादन घटले. गव्हाखालील जमीनीचे प्रमाण १९३८-३९ पावेतो अत्यंत कमी होते. ज्वारी-बाजरी या धान्यपिकांच्या (millets) बाजारपेठेत कापूस, ऊस यांच्याप्रमाणे मोठी वाढ झाली नव्हती. त्यामुळे सरकारलाच तंत्रज्ञान विकासात पुढाकार घ्यावा लागला. परंतु सरकारी प्रयोगशाळांतून आलेल्या नवीन जाती फारशा लोकप्रिय ठरल्या नाहीत. कारण त्या पारंपरिक प्रजातींच्या तुलनेत निर्विवादपणे सरस नव्हत्या. ह्या जातींची यशस्वी लागवड करण्यासाठी जमीन आणि पीक व्यवस्थापनाचे अवघड व खर्चिक तंत्र अवलंबवावे लागे. असे तंत्र अवलंबण्यात तुलनात्मकदृष्ट्या भांडवलाची मोठ्या प्रमाणावर गरज असल्यामुळे ते फार मोठ्या प्रमाणावर अवलंबले गेले नाही.

चार्ल्सवर्थ यांच्या मते या काळात झालेले शेतीचे व्यापारीकरण ग्रामीण रचनेत मोठ्या प्रमाणावर बदल घडवून आणण्याइतके सक्षम नव्हते.[८६] शेतकरी आणि भूमिहीन शेतमजूर अशा टोकाच्या दोन शत्रू वर्गांत शेतकऱ्यांची विभागणी झाली नाही. सामाजिक पुनर्रचनेच्या अभावी, १९३० पावेतो ग्रामीण अर्थव्यवस्था आतून आक्रसू लागली होती. क्लिफर्ड गीर्ट्झ यासाठी involution हा शब्द वापरतात. मृत्यूदरात वाढ होऊन वाढत्या लोकसंख्येच्या दबावावर रोक लावला गेला नव्हता. अधिक श्रमसघन उत्पादनपद्धतींचा वापर करून वाढीव लोकसंख्या शेतीमध्ये जिरवली गेली. शेतीला या आतल्या आत आक्रसण्यामधून बाहेर काढण्यासाठी मार्ग सापडत नव्हता, कारण शेतीच्या क्षेत्राबाहेर उत्पादक गुंतवणुकीसाठी महत्त्वपूर्ण संधी उपलब्ध नव्हता. प्रत्येक व्यक्ती जमेल त्या मार्गाने असलेल्या शेतीमधून पोट भरण्यासाठी धडपडत राहिल्याने, त्या स्पर्धेमुळे दख्खनमध्ये जमिनीच्या वाटण्या होऊन तुकडे तुकडे पडत जाण्याचे प्रमाण वाढत गेले. यामुळे शेतीची पुनर्रचना करण्यातल्या तंत्रवैज्ञानिक समस्या वाढतच गेल्या.

नैसर्गिक आणि तंत्रवैज्ञानिक परिस्थिती व मर्यादा एकत्र आल्याने शेतीचे उत्पादन ठोस स्वरूपात वाढविण्याच्या वाटा बंद झाल्या, या सुमित गुहांच्या निष्कर्षाशी आपणास सहमत व्हायला हवे.[८७] आर्थिकदृष्ट्या तर्कशुद्ध (economic rationality) विचार करून निर्णय करावयाचा तर दख्खनच्या शेतकऱ्यांनी शेती करण्याचे सोडून मजूर बनणे पत्करावयास हवे होते; ते न करता ते जमिनीला धरून राहिले, याचा अर्थ ते अद्यापि आर्थिक लाभहानीच्या निकषांवर स्वतःच्या स्वार्थाची पूर्तता करणारे ('homo-economicus') बनले नव्हते.[८८] आधुनिकतेचा स्वीकार त्यांनी केलेला नव्हता; ते 'मागास' होते. कूळ म्हणून स्वतःच्या शेतीच्या कसणुकीतून त्यांना जे उत्पन्न मिळे त्यापेक्षा मजुरी करून मिळणारे उत्पन्न जास्त होते असे निरीक्षण गुहा नोंदवितात. आणि तरीही हे शेती कसणे सोडत नव्हते. याचे स्पष्टीकरण देणे सहज शक्य आहे. कूळ म्हणून स्वतःच्या शेतीवर कसणूक करण्याचे सोडून शेतकऱ्यांनी मजूर म्हणून काम करावयाचे असेल तर जमीनदारांनी त्यांना स्वतःच्या शेतीवर शेतकऱ्यांना पडत असलेली मजुरी तरी देणे आवश्यक होते. मजुरी पक्की ठरवून मजुरांना कामावर

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

लावल्यावर मजूर चोखपणे काम करतीलच याची खात्री देता येत नाही. एकदा मजूर ठेवल्यावर, त्यांच्याकडून कसून काम घेण्याची खबरदारी जमीनदाराला घ्यायला लागणार. मजुरीने कामावर ठेवले, आणि काम पुरेसे केले नाही म्हणून जमीनदाराने जर कामावरून कमी केले तर बुडणारे (मजुरीचे) उत्पन्न इतके अधिक हवे की, ते गमावणे मजुराला महागात पडावे. या कारणाने, स्वतःच्या शेतीमधून मिळणाऱ्या उत्पन्नाइतके उत्पन्न मिळवून देणारी मजुरी तरी जमीनदाराने देऊ करायला हवी. श्रमशक्तीच्या बाजारपेठेची उभारणी जेथे अपर्याप्त माहितीच्या आधारे होत असते तेथे गुहांना आढळली तशी वस्तुस्थिती आढळू शकते. चायानोव (Chayanova) यांचा आधार घेऊन गुहांनी युक्तिवाद करण्याची गरज नाही. आम्ही सादर केलेल्या विश्लेषणानुसार, दख्खनमधील अर्थव्यवस्था बाजारपेठीय होती आणि भाडोत्री मजूर यांचाही याला अपवाद नव्हता.

लागवडीखालील जमिनीच्या क्षेत्रामध्ये वाढ करण्याची १९३०च्या दशकात मर्यादा गाठली गेल्याने लोकसंख्येचा दबाव एवढा वाढला की शेतांचे धारणाक्षेत्र उत्तरोत्तर संकोच पावत गेले. १९२१ पासून लोकसंख्या वाढू लागली. ह्या वाढीव दरामागे वाढता मृत्यूदर हे महत्त्वाचे कारण होते. मृत्यूदरातील घट ही आरोग्यसुधारणांमुळे झाली असे म्हणणे मात्र यथार्थ होणार नाही.

एकूण लोकसंख्येच्या पोषणात त्या काळात सुधारणे होणे शक्य नव्हते; कारण अन्नधान्याचे दरडोई उत्पादन घटत होते. काही मलेरियाग्रस्त भाग वगळता आरोग्यविषयक सार्वजनिक सोयीसुविधांमध्येही मोठी सुधारणा झाली नाही. मृत्युदरात झालेल्या घटीमागे दुष्काळांची कमी झालेली तीव्रता आणि एकंदरीत रोगराईच्या साथींमध्ये मृत्युमुखी पडणाऱ्यांच्या संख्येतील घट ही दोन महत्त्वाची कारणे दाखविता येतील. दुष्काळांची तीव्रता कमी होण्यास दळणवळणांच्या साधनांत झालेली सुधारणा व राज्यसत्तेचा स्वतःच्या भूमिकेत झालेला बदल हे दोन घटक कारणीभूत झाले. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात प्लेग, मलेरिया, कॉलऱ्यासारखे रोग नवीन प्रदेशात पसरून स्थायिक झाले. सार्वजनिक आरोग्यसोयींमध्ये कोणत्याही प्रकारची सुधारणा झालेली नसताना वाढलेले दळणवळणाचे प्रमाण, हे त्यामागील प्रमुख कारण आपल्याला सांगता येईल. काही मार्गांवरील प्रवासी संख्येत लक्षणीय वाढ होऊनही प्रवाशांसाठीच्या पाण्याच्या साठ्यांच्या स्वच्छतेची काहीही सोय नव्हती. त्यामुळे रोगाला बळी पडल्याचे प्रमाण वाढले. नवीन रेल्वेमार्गाने, विशेषतः बंगालमध्ये, पाण्याचा नैसर्गिक निचरा अडवून, मलेरियाच्या वाढीला उत्तेजन दिले. पाण्याच्या निचऱ्यात येणाऱ्या अडचणी हे मलेरियाचे प्रमुख कारण आहे असे ब्रिटिश सरकारने मानायला नकार दिला. निचरा व्यवस्थेचा खर्च केल्यास ब्रिटिश उच्चभ्रू भांडवलदारांना रेल्वे व सिंचन प्रकल्पांमधून भारतीय गुंतवणुकींवरील मिळणारा नफा कमी झाला असता.[९] म्हणून मलेरिया आटोक्यात आणण्यासाठी quinine वर भर देण्यात आला. ह्या आजारांचा प्रसार व्हायला कुपोषित लोकसंख्येची मदत झाली. या नव्या रोगांनी नव्या प्रदेशांमध्ये ठाण मांडले आणि अन्नधान्याच्या टंचाईमुळे जेव्हा लोकांचे कुपोषण वाढले तेव्हा रोगराईला बळी पडणाऱ्यांचे प्रमाण एकदम स्फोटक प्रमाणात वाढले. या रोगांपासून मृत्यू ओढविण्याचे प्रमाण कालांतराने कमी झाले ते, दळणवळणाची साधने सुधारल्यामुळे अन्नटंचाईच्या काळात लांब लांबहून टंचाईग्रस्त भागात अन्नधान्य पोचवता येऊ लागल्याकारणाने अन्नधान्याची उपलब्धता वाढली त्यामुळे, असे ह्याचे एक कारण सांगता येईल.[१०] याचा अर्थ अन्नधान्याचा पर्याप्त पुरवठा लोकांना होत होता असा घ्यावयाचा नाही. दुसरे कारण, जगले-वाचलेल्या लोकांच्या ठायी या रोगांना प्रतिकारशक्ती (immunity) वाढली हे सांगितले जाते.[११]

१९३० च्या दशकात महामंदीमुळे आंतरराष्ट्रीय मागणी कमी झाली आणि शेतमालाच्या किंमती घसरू लागल्या. शेती भांडवल इतर क्षेत्रांकडे जाऊ लागले. मोठ्या शेतकऱ्यांनी नगदी पिकांची लागवड बंद न करता, लागवडीचा खर्च कमी करण्याचे प्रयत्न सुरू केले. श्रमसघन आणि भांडवलसघन तंत्रज्ञानाकडे मोठे शेतकरी झुकू लागले. १९२९ ते १९३१ या काळात मुंबई इलाख्यातील शेतमजुरीचा दर २०% पेक्षाही अधिक घसरला. घरातल्या सर्वांना काम देण्याइतपत शेती नसलेल्या छोट्या शेतकऱ्यांवर त्याचा मोठाच वाईट परिणाम झाला. शेतीतील भांडवलाची उपलब्धता कमी झाल्यामुळे लहान शेतकऱ्यांनी मोठ्या शेतकऱ्यांकडून कर्जे काढण्यास सुरुवात केली. मोठ्या शेतकऱ्यांना ह्या प्रक्रियेतून बांधील मजूरवर्ग उपलब्ध झाला. खंडाने शेती करणाऱ्यांचे प्रमाणदेखील ह्या काळात वाढले. कौटुंबिक गरजेच्या वस्तूंच्या किंमती १९४० च्या दशकात वाढू लागल्या. परंतु कमी जमीन आणि तोटका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पतपुरवठा ह्यामुळे सर्वसाधारण शेतकऱ्याला वाढत्या किंमतींचा फायदा घेण्यासाठी वाढीव उत्पादन करणे कठीण होऊन बसले होते. कोणी विसाव्या शतकाच्या चौथ्या दशकाच्या सुरुवातीसच महाराष्ट्रामध्ये दारिद्र्य आणि आर्थिक विषमता (संख्येने थोड्या अशा बलवान अभिजनवर्गाच्या हातात आर्थिक आणि सामाजिक गतिशीलतेच्या सर्व संधी एकवटलेल्या असणे) ही मागासलेपणाची चिन्हे प्रकर्षाने जाणवू लागली होती.

बी.आर. टॉम्लिन्सन ह्यांच्या सखोल व साधार अभ्यासानुसार १८६०-१९७० ह्या कालखंडात महाराष्ट्रात निर्माण झालेला आर्थिक मागासलेपणा हा साम्राज्यवादी भांडवलदारीखालील समाजरचनेचा किंवा केवळ लोकसंख्या-वाढीचा अपरिहार्य परिणाम नव्हता.[१२] त्यांच्या मते ब्रिटिश सत्तेच्या शेवटच्या दोन दशकांतील संस्थात्मक रचनेमधील (विशिष्ट उणीवा) आणि बाजारपेठेचे कोसळणे ह्यामुळे मागासलेपणाचा प्रादुर्भाव झाला. टॉम्लिन्सन ह्यांनी निवडलेल्या कालखंडापेक्षा मोठ्या कालखंडाकडे बघितले तर मात्र आपल्याला वेगळा निष्कर्ष काढावा लागेल. टॉम्लिन्सन १८६० च्या स्थितीची तुलना १९४७ च्या स्थितीशी करतात. ब्रिटिशपूर्व परिस्थितीशी ब्रिटिशोत्तर महाराष्ट्राची तुलना केल्यास साम्राज्यवादाच्या आर्थिक धोरणांनी ब्रिटिशपूर्व अर्थव्यवस्थेला छेद दिलेला दिसतो. ब्रिटिशपूर्व महाराष्ट्र हा मोठ्या प्रमाणावर व्यापारीकरण झालेला, बाजारपेठांवर अवलंबून असलेला समाज होता. राजकीय प्रभुत्व, वतने व वतनदारी हक्कांनी चालत येणारी पदे, लष्करी संरक्षण या बाबींच्या बाजारपेठा सक्रिय होत्या. मजुरी, कर्ज व वित्तपुरवठा, भांडवल, जमिनींची खरेदीविक्री आणि उत्पादित मालाची खरेदीविक्री या बाबींच्या रूढ पारंपरिक बाजारपेठा सक्रिय होत्या.

ही बाजारपेठ बऱ्याच अंशी स्पर्धात्मक बाजारपेठ होती. यांमध्ये मोठ्या प्रमाणावर भांडवली गुंतवणूक झालेली होती व राज्यसत्तेच्या खुल्या स्वरूपाच्या संदर्भात या बाजारपेठेतील मोबदल्याचे स्वरूप महत्त्वाचे होते. ब्रिटिश राज्यसत्ता आल्यानंतर राज्यसत्तेचे स्वरूप बदलले. खुली, विविध गटांना समाविष्ट करणारी राज्यसत्ता जाऊन एकमुखी, नोकरशाही राज्यसत्ता समोर आली. (वरीलपैकी तीन प्रकारच्या बाजारपेठा नष्ट झाल्या. त्या उद्योगांमध्ये गुंतलेले भांडवल तर नामशेष झालेच, परंतु गुंतवणुकीवर सर्वाधिक मोबदला देणारे पर्याय पण नष्ट झाले. म्हणजेच, ब्रिटिश सत्तेच्या स्थापनेनंतर येथील भांडवलात आणि भांडवलवृद्धीच्या दरात घट झाली. येथील भांडवलदारांना तुलनेने कमी मोबदला देणाऱ्या शेतीमालाच्या बाजारपेठा फक्त उरल्या. त्यातसुद्धा नगदी पिकांना जशी मागणी आली तशी गुंतवणूक व तांत्रिक विकासाला गती आली. पण ही मागणी स्थायी स्वरूपाची नव्हती. त्यामुळे कायमस्वरूपी विकासप्रक्रिया येथे सातत्याने टिकू शकली नाही. राजकीय गतिशीलता नष्ट झाल्यामुळे समाजरचना गोठल्यासारखी झाली. जातींचा राजकीय संदर्भ नष्ट झाल्यावर जातिव्यवस्थेचे पोकळ कवचच येथे राहिले हे आपण पाहिले आहे. ब्रिटिशपूर्वकाळात ह्या जातिव्यवस्थेचा समाजमनावर पगडा होताच. परंतु बाजारपेठी यंत्रणा जर समर्थपणे कार्यरत राहिल्या असत्या आणि मागणीस्रोतांशी त्यांची नाळ घट्टपणे जोडलेली राहिली असती तर स्वातंत्र्य मिळाले तेव्हा शेतकी व ग्रामीण अर्थव्यवस्था पुष्कळ अधिक जोमदार अवस्थेत आढळली असती.

**समारोप**

आपण पाहिले की, ज्यांच्यापाशी भांडवलाचा संचय होत होता त्यांच्या दृष्टीने राजकीय सत्तासंपादनाच्या खेळात तो गुंतविणे सर्वात जास्त किफायतशीर होते. महाराष्ट्रात कारखानदारी औद्योगिक उत्पादनामध्ये भांडवल गुंतवण्यापेक्षा विविध प्रकारचा माल बाहेरून आयात करणे हे जास्त किफायतशीर ठरत होते. सधन, नागर वरिष्ठ वर्ग लहान होता; त्याची एकंदर मागणी मोठी नव्हती. येथील शेतीचे उत्पादनही, येथील पर्यावरणाच्या मर्यादांमुळे, मोठ्या प्रमाणावर शेतमालाची निर्यात करण्याएवढे वाढीव असू शकत नव्हते. परप्रदेशांतील मोहिमांमधून, परराज्यांकडून मिळणाऱ्या खंडण्यांमधून 'मराठा स्वराज्या'मध्ये पैशाचा ओघ येत होता. त्यामधून येथील सत्तासंपादनासाठी चाललेल्या फंदाफितुरीच्या ('fitna') राजकारणासाठी भांडवल उपलब्ध होत होते. यामधून येथे व्यापक प्रमाणावर आर्थिक उलाढालींना चालना मिळाली, आणि सामाजिक-आर्थिक चलनवलन वाढत गेले. महाराष्ट्रदेशी जर एवढे सारे भांडवल उपलब्ध होते तर येथे इंग्लंड वा पश्चिम युरोपीय धाटणीची औद्योगिक क्रांती का झाली नाही, हा प्रश्न उपस्थित केला जाईल.

आधुनिक कालखंडाच्या आरंभीच्या पश्चिम युरोपकडे आपण वळलो तर दोन वैशिष्ट्यपूर्ण गोष्टी आढळतात. आधुनिक राष्ट्र-राज्याच्या प्रस्थापनेबरोबर एक मजबूत केंद्रीय राज्यसत्ता









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अस्तित्वात आली. सत्तासंपादन आणि सत्ताविस्तार यांमध्ये पैसा, शक्ती-बुद्धी गुंतविण्याच्या किफायतशीर संधींचा संकोच झाला. त्याचवेळी वस्तूंचे उत्पादन वाढवून त्यांची देशांतर्गत व देशावाहेर विक्री, आयात-निर्यात व्यापार यांना केंद्रीय राज्यसत्तांनी स्वतःच्या सत्तावृद्धीसाठी प्रोत्साहन दिले. यामुळे, व इतर काही विशिष्ट परिस्थितीमुळे, औद्योगिक कारखानदारी उत्पादन व व्यापार यांमध्ये अभिक्रमशील भांडवलदार असामींसाठी किफायतशीर संधी उपलब्ध झाल्या.

येथील परिस्थिती अगदी वेगळी होती. महाराष्ट्रदेशी एक समर्थ व सर्वंकष केंद्रीय सत्ता प्रस्थापित झाली असती तर १८व्या शतकात आपणास आढळली ती वाढती आर्थिक उलाढाल व तिच्यामुळे उत्पन्न झालेली गतिमानता यांवरच आघात झाला असता. राज्यसत्ता खालच्या, स्थानिक पातळ्यांवरील तिच्या 'एजंटा'ना – म्हणजे सरदार, वतनदार, प्रशासनातील मुख्य कारभारी इत्यादी – पूर्णपणे नियंत्रणाखाली ठेवू शकत नव्हती यावरच वाढती आर्थिक उलाढाल व गतिमानता या दोन्ही गोष्टी अवलंबून होत्या असे लक्षात येईल. १८व्या शतकात, पेशव्यांच्या नेतृत्वाखाली 'मराठा स्वराज्या'चा भारतभर जो विस्तार झाला तो विस्तार ही आर्थिक वृद्धी व सामाजिक-आर्थिक चलनवलन यांची गुरुकिल्ली होती. आणि केंद्रीय राज्यसत्तेची पकड ढिली पडून, अभिक्रमशील व्यक्तींना राजकीय सत्तेच्या क्षेत्रामध्ये सत्तेचा बाजार मांडता आला याचे रहस्य यामध्येच होते.

पश्चिम युरोपात केंद्रीय समर्थ राज्यसत्तांचीच ही गरज होती की त्यांच्या त्यांच्या राष्ट्र-राज्यांमध्ये औद्योगिक उत्पादन वेगाने वाढावे आणि देशांतर्गत व देशावाहेर, दोन्ही क्षेत्रांत व्यापारी वर्चस्व त्यांच्या देशातील भांडवलदारांचे प्रस्थापित व्हावे. यासाठी उपकारक अशी धोरणे त्यांनी राबवली. पश्चिम युरोपीय राष्ट्रांमध्ये घडून आलेल्या औद्योगिक-भांडवलशाही क्रांतीच्या मागे हा रेटा, हे प्रोत्साहन होते, हे ध्यानात ठेवले पाहिजे.[१३]

याच्याशी तुल्यबल घडामोड महाराष्ट्रदेशी घडून आली असती तर येथेही ज्यांच्या हाती आधीच्या काळातील राजकारणामधून भांडवल संचय झाला होता त्यांनी सर्वाधिक किफायतशीर गुंतवणुकीच्या औद्योगिक-व्यापारी संधी धुंडाळल्या असत्या असे म्हणावयास जागा आहे. महाराष्ट्रात तंत्रविज्ञान विकसित झालेले नव्हते ही अडचण अनुल्लंघ्य नव्हती, कधीच नसते. प्रगत तंत्रविज्ञान नेहमीच विकत घेता येते.

निर्णायक मुद्दा, आधुनिकीकरण-औद्योगीकरणाचे प्रवर्तन करणारी राज्यसत्ता म्हणून समर्थ केंद्रीय राज्यसत्ता व्यवहार करते का, प्रोत्साहक धोरणे अंगिकारते की नाही, हा ठरतो. आधीच्या राज्यसत्तेच्या तुलनेत ब्रिटिश राज्यसत्ता सर्वंकष होती, आणि करभार गोळा करताना होणारी 'गळती', वा कर गोळा करण्यासाठी 'मध्यस्थां'ना द्याव्या लागणाऱ्या हिश्श्याचे प्रमाण नक्कीच कमी झाले असणार. सार्वभौम सत्तेच्या रिंगणात उतरणारे एतद्देशीय 'भांडवलदार' (portfolio capitalists) तिने निष्प्रभ व निष्प्राण केले होते. त्यांना संस्थानिक बनवून गोठवून टाकले होते वा पेन्शनीत काढून घरी बसविले होते, वा त्यांना नामशेष केले होते. अगदी तळच्या पातळ्यांवर ब्रिटिश वासाहतिक धोरणांचा जवळपास काहीच परिणाम झाला नाही असे अर्वाचीन भारतीय आर्थिक इतिहासाच्या विद्वान अभ्यासकांमध्ये प्रचलित असलेले एक शिष्टमान्य मत आहे. जमाबंदी (land revenue surveys), डेक्कन ॲग्रिकल्चरिस्ट रिलीफ ॲक्ट यांसारख्या विशिष्ट कृती वा कायदे यांच्या बाबतीत असे म्हणता येते. पण ब्रिटिशपूर्व काळापासूनचा मोठा कालखंड विचारात घेतला, तर वासाहतिक राजवटीचा आघात मूलगामी व विध्वंसक ठरल्याचे दिसून येईल. एतद्देशीय भांडवलगुंतवणुकीत एका फटक्यासरशी प्रचंड घट झाली. वस्तूंची व श्रमाची पारंपरिक बाजारपेठ (commodities and labour markets) हीच तेवढी भांडवली गुंतवणुकीसाठी खुली राहिली. पर्यावरणीय मर्यादांमुळे तत्कालीन बाजारपेठांमधील व्यवहार मोठा पैसा मिळवून देणारे नव्हते; बाजारपेठ तुकड्यातुकड्यांमध्ये विभागलेली होती, आर्थिक उलाढाल किफायतशीर होण्यासाठी आवश्यक व सहाय्यभूत माहिती चटकन सर्वदूर उपलब्ध होत नव्हती, आणि एकंदर मागणी कमीच झालेली होती. ब्रिटिश राज्यसत्ता स्थापन झाल्यावर आर्थिक उलाढालींमध्ये वाढ होण्यास सकृद्दर्शनी पूरक अशा कित्येक सुधारणा झाल्या. उदा. चलनी नाणी, वजने व मापे यांचे सुसूत्रीकरण, सर्व हंगामांमध्ये वापरता येण्यासारखे रस्ते, रेल्वे इत्यादी. पण अर्थव्यवस्थेच्या व्यापारीकरणास चालना देणारी 'बाजार' ही शक्ती तशी दुबळी होती. आर्थिक वाढ सातत्याने गतिमान ठेवण्याच्या दृष्टीने ती पर्याप्त नव्हती. दर डोई उत्पन्नात ठोस वाढ घडवून आणण्यातही ती यशस्वी ठरली नाही. या काळात कृषि-अर्थव्यवस्था ठप्प होती याकडे यापूर्वीही चार्ल्सवर्थसारख्या

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अभ्यासकांनी लक्ष वेधले आहेच. १८व्या शतकातील दख्खनचे आर्थिक चित्र, सामाजिक-आर्थिक चलनवलनाच्या अंगाने पाहता, तुलनेने, प्रवाही, गतिमान, वर्धिष्णू आढळते. आर्थिक व्यवहार पूर्ण करण्यासाठी मोजावी लागणारी किंमत ('transaction costs') लक्षणीय प्रमाणात कमी करणारी शासनव्यवस्था ब्रिटिशांनी येथे प्रस्थापित केली. वास्तविक आर्थिक वाढविकासाला यामुळे मोठी चालना मिळावयास हवी होती. पण भांडवलावर मिळणारा परतावा नेमका याकारणाने कमी झाला आणि त्याचा परिणाम आर्थिक वाढविकास मंदावण्यात झाला.

वाहतुकीची साधने विकसित झाल्यावर प्रादेशिक-राष्ट्रीय बाजारपेठा अस्तित्वात आल्या, नगदी व्यापारी पिकांना मागणी वाढली, शेतीत गुंतवलेल्या भांडवलावर परतावा बरा मिळू लागला, तसा या संधींचा फायदा घेण्यासाठी उद्यमी व्यक्ती जरूर पुढे आल्या. यात सहभाग व्यापक स्वरूपाचा (broad based) राहिला, पण दर डोई उत्पन्नामध्ये ठळकपणे वाढ होण्याइतका परतावा मिळत नव्हता. इतरही अंतर्विरोध उघड होत गेले. खासकरून १८२० नंतर मृत्यूदर झपाट्याने खाली आल्यामुळे, शेतजमिनीची टंचाई उत्पन्न झाली. निकृष्ट प्रतीच्या जमिनी लागवडीखाली येऊ लागल्या. यामुळे चारा कमी होऊन गुराढोरांचे पोषण उणे पडू लागले. खताचा पुरवठाही कमी झाला. धान्याचे उत्पादन वाढविण्यासाठी शेतीत शेतकऱ्यांना परवडेल असे नवे तंत्रविज्ञान प्रसारित करण्याचा सरकारने कसून प्रयत्न केला असे म्हणता येत नाही. शेतमालाला मागणी वाढती राहील अशा प्रकारचे उपाय, त्यादृष्टीने उपकारक अशी शेतीव्यवस्थेची फेररचना पण ब्रिटिश शासनाने केली नाही. शेतीमध्ये गुंतवलेल्या भांडवलावर चांगला परतावा मिळावा या शेतीक्षेत्रातील उद्योजकांच्या आकांक्षेला राजकीय प्रतिसाद देण्याइतके साम्राज्यवादी शासन संवेदनशील नव्हते. शेतकऱ्यांना वाजवी व्याजदराने पतपुरवठा व्हावा यासाठी प्रयत्न झाले जरूर, पण ते नेटाने व पर्याप्त प्रमाणात झाले नाहीत. ग्रामीण समाजात असंतोष माजून स्थैर्य बिघडू नये, आणि आपल्या अधिकृत धोरणांची शिष्टमान्यता व प्रतिष्ठा टिकून राहावी — म्हणजे, रयतवारी पद्धतीचे समर्थन व्हावे — यामध्ये शासनाचा हितसंबंध खऱ्या अर्थाने गुंतलेला होता. १९१८ सालचा किटिंगच्या नावे प्रसिद्ध असलेला जमीन हस्तांतरणविषयक कायदा हे ह्याचे उदाहरण म्हणून सांगता येईल. विसाव्या शतकाच्या आरंभी मालकीच्या वाटण्यांमुळे शेतांचे लहानलहान तुकडे पडण्याची गोष्ट इतकी वाढली होती की किटिंग, हॅरॉल्ड मॅन (Keatinge, Harold Mann) आणि इतरांनी हा प्रश्न ऐरणीवर आणला होता. जी. किटिंगने १९१८ साली यावाबतीत एक (कायद्याचा) प्रस्ताव समोर ठेवला. या कायद्याच्या पालनाची सक्ती केली जाणार नव्हती. शेतकऱ्यांना स्वेच्छेनुसार याचा लाभ घेण्यास वा न घेण्यास मुभा राहणार होती. कलेक्टरकडे अर्ज करून आपल्या मालकीच्या शेतांची नोंद 'economic holding' या सदराखाली करता येणार होती. त्या शेतजमिनींमध्ये हितसंबंध गुंतलेल्यांपैकी कोणाची खास हरकत नसल्याची खातरजमा कलेक्टर करून घेणार होता. एकदा दप्तरी 'economic holding' म्हणून नोंद झाल्यावर मग त्याचे वाटे पाडता येणार नव्हते. एकच शेतकरी त्याची कसणूक करणार होता. त्याच्या पश्चात मोठ्या मुलाच्याकडे मालकी जावी अशी तरतूद होती. (primo-geniture पद्धतीने). या मसुद्याला भारत सरकारची (Govt. of India) अनुकूलता व मान्यता प्रथमतः प्राप्त झाली. पण जेव्हा संकल्पित कायद्याचा मसुदा अभिप्रायासाठी अधिकाऱ्यांमध्ये व्यापक प्रमाणावर प्रसृत करण्यात आला तेव्हा सरकारी अधिकाऱ्यांकडूनच या प्रस्तावाला विरोध झाला. शेतजमिनीचे विभाजन/वाटण्या होऊ नये, छोटे छोटे तुकडे पडू नयेत असा कायदा अंमलात आला तर मुंबई इलाख्यातील जमिनींच्या मालकीचा संपूर्ण नकाशा बदलून जाईल आणि लक्षावधी शेतकरी भूमिहीन मजूर बनतील ही अधिकारीवर्गाची भीती होती. राजकीयदृष्ट्या ही एक नाजुक बाब बनली.

१९१९ च्या नोव्हेंबरमध्ये, सदर बिलाचा पाठपुरावा करण्यात येणार नाही, असे भारत सरकारला कळविण्यात आले.[१४] १९८० ते १९३५ च्या दरम्यान झालेल्या बहुतेक सर्व धोरणविषयक चर्चांचा शेवट साधारणपणे असाच झालेला दिसतो. जोपर्यंत राजकीय असंतोष पुरेसा वाढत नाही किंवा रयतवारी पद्धतीत धोका नाही असे वाटत होते तोपर्यंत परिस्थिती भरकटू दिली जात होती.

१९०१ च्या 'फमिन कमिशनने' दिलेल्या अहवालानुसार रयतवारी पद्धतीच्या ताठरपणामुळे १८९० च्या दशकातील दुष्काळांच्या तीव्रतेत भर पडली. परंतु रयतवारी पद्धतीखाली मुंबई इलाख्यात परिस्थिती कशी उत्तम आहे यावर, त्याकाळातील प्रशासकीय अहवालांमध्ये सतत भर आढळतो. अशाच प्रकारे,






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कुळांविषयी वेळोवेळी सुचविलेले कायदे करण्याची चर्चा संपुष्टात आली. कुळांना संरक्षण देण्याविषयीचा कायदा म्हणजे रयतवारी पद्धतीत सुधारणेची गरज मान्य करणे, अशी प्रशासनाची सर्वसाधारण मानसिकता होती. शेतीचा विकास घडून येण्यासाठी ठोस पावले टाकण्याची निकड नसलेल्या, 'जैसेथे' वृत्तीच्या प्रशासनाचे दर्शन आपल्याला येथे घडते. मुंबई इलाख्यातील रयतवारी पद्धतीवरील टीका परतवून लावण्यासाठी प्रशासन एकजुटीने उभे राहत गेल्याने सहकारी सोसायट्यांमार्फत पतपुरवठा करण्याची यंत्रणा मजवूत उभी करणे निकालात काढले गेले.[९५]

अशा रीतीने, १९व्या शतकाच्या ओघात दख्खनच्या अर्थव्यवस्थेमध्ये मागासलेपणाची चिन्हे दृग्गोचर होत गेली. विसाव्या शतकाच्या तिसऱ्या दशकात मागासलेपण ठळक बनले. 'आर्थिक वाढ-विकास' या विषयावरील क्रमिक पुस्तकांमध्ये आधुनिकपूर्व काळात, आजचे विकसनशील/मागास समाज कायमचे मागास होते, तीच त्यांची अचल अशी प्रकृती होती असे प्रतिपादन केले जाते.[९६] हे प्रतिपादन यथार्थ नाही ही गोष्ट आम्ही वर सादर केलेल्या विश्लेषणावरून दिसून येते.

आजच्या 'मागासलेल्या' समाजांची, मागासलेपण ही नेहमीची अचल स्थायी स्थिती नव्हती. विसाव्या शतकातील महाराष्ट्रात विशिष्ट प्रकारची राज्यसत्ता, समाजाच्या विविध पातळीवरील राजकीय प्रक्रियेचे स्वरूप, पर्यावरणाची विशिष्ट स्थिती, बाजारपेठांचे स्वरूप आणि त्या संरचनेमध्ये खाजगी व्यक्तींना सामाजिक आणि आर्थिक गतीशीलतेच्या उपलब्ध होत असलेल्या संधी (वा संधींचा अभाव) ह्या सर्वांचा विशिष्ट परिपाक म्हणून आर्थिक मागासलेपणाची निर्मिती येथे झाली.

परिशिष्ट क्र. १

**ज्वारीच्या किंमती : इंदापूर, जि. पुणे**

| वर्ष | दर रूपयास शेर | वर्ष | दर रूपयांस शेर |
|---|---|---|---|
| १८०९ | २४ | १८३८ | ३६ |
| १८१० | २४ | १८३९ | ६७ |
| १८११ | २२ | १८४० | ४४ |
| १८१२ | २५.५ | १८४१ | ६४ |
| १८१३ | २७ | १८४२ | ५६ |
| १८१४ | २८ | १८४३ | ६८ |
| १८१५ | ३३.५ | १८४४ | ७२ |
| १८१६ | २६ | १८४५ | ६० |
| १८१७ | ४८.५ | १८४६ | ३६ |
| १८१८ | २४ | १८४७ | १५ |
| १८१९ | १७ | १८४८ | ४८ |
| १८२० | १९.५ | १८४९ | ७२ |
| १८२१ | ३२ | १८५० | ७२ |
| १८२२ | ३२ | १८५१ | ३८ |
| १८२३ | ३२ | १८५२ | ७२ |
| १८२४ | ३६.७५ | १८५३ | ३८ |
| १८२५ | १२.५ | १८५४ | ४० |
| १८२६ | ४४ | १८५५ | ५६ |
| १८२७ | ६४ | १८५६ | ५६ |
| १८२८ | ३२ | १८५७ | २९ |
| १८२९ | ८० | १८५८ | ३२ |
| १८३० | ४६ | १८५९ | ३२ |
| १८३१ | ४० | १८६० | ३९ |
| १८३२ | ६० | १८६१ | ३३ |
| १८३३ | २३ | १८६२ | २७ |
| १८३४ | ४६ | १८६३ | १६ |
| १८३५ | ४८ | १८६४ | १३ |
| १८३६ | ३८ | १८६५ | NA |
| १८३७ | ६६ | १८६६ | NA |

सुमित गुहा, *धि अग्रेरियन इकॉनॉमी ऑफ धि बॉंबे डेक्कन, ऑक्सफर्ड युनिक प्रेस, दिल्ली, १९८५, पृ. १८.*

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

टिपा :

३३. ताराबाईकालीन कागदपत्रे, खंड १, क्र. १४५, पृ. २०४-२०५.

३४. कित्ता, क्र. ६२, पृ. ९५. ३५. कित्ता, खंड १, क्र. २३३.

३६. कित्ता, क्र. २९३. ३७. कित्ता. क्र. २८२.

३८. कित्ता, क्र. २३०.

३९. एस.एन. जोशी *मराठेकालीन समाजदर्शन*, अनाथ विद्यार्थी गृह प्रकाशन, पुणे, १९६०, पृ. ११९-१२१.

४०. कित्ता, पृ. ११७-११८.

४१. एस्. वेली, *कास्ट, सोसायटी अँड पॉलिटिक्स इन इंडिया फ्रॉम धि एटीन्थ सेंच्युरी टु धि मॉडर्न एज, धि न्यू केंब्रिज हिस्टरी ऑफ इंडिया, खंड IV-3,* केंब्रिज युनिव्हर्सिटी प्रेस, केंब्रिज, १९९९, विशेषतः प्रकरण १.

४२. ताराबाईकालीन कागदपत्रे, क्र. २५२.

४३. कित्ता, क्र. २४९

४४. अशा उदाहरणांसाठी : पहा नीलिमा भावे, *राज्यसत्तेच्या फटीमधून पेशवेकालीन स्त्रिया : स्त्री-मुक्तीच्या महाराष्ट्रातील पाऊलखुणा*, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८९.

४५. ब्राउटन, टी, *लेटर्स फ्रॉम ए मराठा कॅम्प ड्युरिंग धि वॉर ऑफ १८०९,* लंडन; ओ'हॅनलॉन, रोझालिंड, *ए कंपॅरिझन बिटवीन, वुईमेन ॲन्ड मेन : ताराबाई शिंदे अँड धि क्रिटिक ऑफ जेंडर रिलेशनशिप्स इन कलोनिअल इंडिया*, ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, मद्रास, १९९४, पृ. २०-२१.

४६. वेली, सी.ए. *रूलर्स, टाउन्समेन अँड बझार्स : नॉर्थ इंडियन सोसायटी इन धि एज ऑफ ब्रिटिश एक्सपॅन्शन.*

४७. चाफेकर, एन.जी., *पेशवाईच्या सावलीत,* भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे, १९३७.

४८. कित्ता, पृ. २४९. ४९. कित्ता, पृ. २५१. ५०. कित्ता, २५०.

५१. गोखले, बी.जी., *पूना इन धि एटीन्थ सेंच्युरी*, ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, १९८८, पृष्ठे १५७-१६५.

५२. गोखले, बी.जी. कित्ता, पृ. १५३.

५३. पार्लमेंटरी पेपर्स, १८३१-१८३२, हाऊस ऑफ कॉमन्स, *अफेअर्स ऑफ धि ईस्ट इंडिया कंपनी*, एव्हिडन्स खंड ४, प्रश्न क्र. १९३५.

५४. अधिक तपशीलवार विवेचनासाठी पहा : हातेकर, नीरज, 'फार्मर्स अँड मार्केट्स इन धि प्रि-कलोनिअल डेक्कन : धि प्लॉझिबिलिटी ऑफ इकॉनॉमिक ग्रोथ इन "ट्रॅडिशनल सोसायटी" '. (अप्रकाशित हस्तलिखित.)

५५. साइक्स या ब्रिटिश अंमलदाराने केलेल्या खानदेशाच्या जनगणनेचा अहवाल १८२६ सालचा आहे. रास्ते कुटुंबाच्या राजकीय उत्कर्षाबरोबर त्यांचे इनामी गाव असलेले सावदा हे खानदेशातील छोटे शहर भरभराट पावून मोठ्या शहरात रूपांतरित झाले. हीच हकीकत फैजपूर या छोट्या खेड्याची. १९व्या शतकाच्या आरंभी ५००० हून अधिक लोकसंख्या या गावाची होती.

५६. तपशीलांसाठी पहा, हातेकर, नीरज, पूर्वोक्त.

५७. पहा मेटकाफ, टी.आर., *आयडियॉलॉजीज ऑफ धि राज, केंब्रिज न्यू इकॉनॉमिक हिस्टरी ऑफ इंडिया*, केंब्रिज युनिव्हर्सिटी प्रेस, केंब्रिज १९९५, पृ. २६; ड्युई, सी., 'इमेजीस ऑफ व्हिलेज कम्युनिटी इन अँग्लो-इंडियन आयडियालॉजी', मॉडर्न एशियन स्टडीज, VI, पृ. २९१-३२८; ब्रेमन, जे., धि शॅटर्ड इमेज : कन्स्ट्रक्शन अँड डी-कन्स्ट्रक्शन ऑफ धि व्हिलेज इन कलोनिअल साऊथ एशिया', कंपॅरेटिव्ह एशियन स्टडीज-२, सेंटर फॉर एशियन स्टडीज, ॲम्सटरडॅम, १९८७.

५८. *सिलेक्शन्स फ्रॉम धि सातारा राजाज अँड पेशवाज डायरीज (SSRPD), बाळाजी बाजीराव, खंड १,* संपादन : रावबहादूर गणेश चिमणाजी वाड आणि वी.पी. जोशी, धि पूना व्हर्नाक्यूलर ट्रान्स्लेशन सोसायटी, पुणे १९१२, पृ. २०६.

५९. SSRPD, थोरले माधवराव, खंड २, पुणे १९११.

६०. SSRPD, बाळाजी बाजीराव, खंड १, पृ. २२३.

६१. SSRPD, कित्ता, पृ. ३८३.

६२. SSRPD, कित्ता, पृ. २४४.

६३. पहा, गोखले, वी.जी., पूर्वोक्त, पृ. ७८-७९.

६४. तपशीलांसाठी पहा, वेली, सी., *इंडियन सोसायटी अँड धि मेकिंग ऑफ धि ब्रिटिश एम्पायर, प्रकरण २.*

६५. *इंडिया अँड ओरिएंटल ऑफिस कलेक्शन्स,* धि ब्रिटिश लायब्ररी, लंडन, V/27/70/10, पृ. ६९.

६६. पार्थसारथी प्रसन्न, पूर्वोक्त.

६७. भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे, खंड २४, क्र. १, जुलै १९४३, पृ. ९०-९३.

६८. गोखले, बी.जी., पूर्वोक्त, पृ. २१.

६९. विल्यम चॅप्लीन, २० ऑगस्ट १८२०, ईस्ट इंडिया पेपर्स, खंड ४, पृ. ५१६.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

७०. चोक्शी, आर.डी., *धि इकॉनॉमिक हिस्टरी ऑफ धि बॉंबे डेक्कन अँड कर्नाटक १८१८-१८६८*, पुणे.

७१. सुमित गुहा, पूर्वोक्त, प्रकरण दुसरे : धि अर्ली इयर्स ऑफ धि न्यू रेजीम.

७२. गुहा, कित्ता, पृ. ३०. ७३. गुहा, कित्ता, मध्ये उद्धृत पृ. २६.

७४. पहा गुहा, कित्ता, पृ. २१.

७५. पहा, मेटकाफ, टी.आर., *आयडियालॉजीज ऑफ धि राज*, प्रस्तावना.

७६. लोकहितवादी गोपाळ हरी देशमुख, *लक्ष्मीविज्ञान (चार जुने मराठी अर्थशास्त्रीय ग्रंथ* मध्ये समाविष्ट) संपादन : दि.के. वेडेकर, गोखले अर्थशास्त्र संस्था, १९६९, पृ. ६८-६९.

७७. लोकहितवादी, कित्ता, पृ. ६९-७१.

७८. लोकहितवादी, कित्ता, पृ. ६९, पृ. ५३ *चार जुने मराठी अर्थशास्त्रीय ग्रंथ* मध्ये समाविष्ट रामकृष्ण विश्वनाथ यांचे पुस्तकही वघावे.

७९. पहा चार्ल्सवर्थ, एन., *पेझन्ट्स अँड इंपीरिअल रूल : ॲग्रिकल्चर अँड ॲग्रेरियन सोसायटी इन धि बॉंबे प्रेसिडेन्सी, १८५०-१९३५*, केंब्रिज युनिव्हर्सिटी प्रेस, केंब्रिज,१९८५ या ग्रंथात या काळातील जमिनीच्या उपलब्धतेविषयी वेगळे मत (प्रकरणे ५ व ७ यांमध्ये) व्यक्त केले आहे ते पहावे.

८०. चार्ल्सवर्थ, एन., पृ. १७२.

८१. सुमित गुहा, पूर्वोक्त, पृ. ५४-७०.

८२. सुमित गुहा, पूर्वोक्त, पृ. ७९-८१.

८३. किटिंग, जी., *रूरल इकॉनॉमी इन धि बॉंबे डेक्कन*, लॉंगमन, ग्रीन अँड कंपनी, लंडन, १९१२. १८७३ ते १९१० या दरम्यान अहमदनगर जिल्ह्यामध्ये शेतमजुरीचे जे वास्तविक व कागदोपत्री दर होते त्यांच्यातला फरक दाखविणारा तक्ता पहा.

८४. चार्ल्सवर्थ, पूर्वोक्त, पृ. १७१.

८५. सुमित गुहा, पूर्वोक्त, पृ. १०६-१०७ मध्ये उद्धृत केल्यानुसार.

८६. चार्ल्सवर्थ, एन., पृ. २९९.

८७. सुमित गुहा, पूर्वोक्त, पृ. ११८.

८८. सुमित गुहा, पूर्वोक्त, पृ. १५८-१५९.

८९. शेल्डन वॉट्स, 'ब्रिटिश डेव्हलमेंट पॉलिसीज अँड मलेरिया इन इंडिया १८९७-१९२९', *पास्ट अँड प्रेझेन्ट*, क्र. १६५, नोव्हेंबर १९९९, पृ. १४१-१८१.

९०. सुमित गुहा, मॉर्टलिटी डिक्लाइन इन अर्ली ट्वेंटिएथ सेंच्युरी इन इंडिया : ए प्रिलिमिनरी इन्क्वायरी', *धि इंडियन इकॉनॉमिक अँड सोशल हिस्टरी रिव्ह्यू*, ऑक्टोवर-डिसेंवर, १९९१.

९१. इरा क्लाइन, 'पॉप्युलेशन ग्रोथ अँड मॉर्टलिटी इन ब्रिटिश इंडिया – धि डेमॉग्राफिक रेव्होल्यूशन', *धि इंडियन इकॉनॉमिक अँड सोशल हिस्टरी रिव्ह्यू*, जानेवारी-मार्च १९९०; इरा क्लाइन, 'इंपीरिॲलिझम, इकॉलॉजी अँड डिसीज : कॉलरा इन इंडिया १८५०-१९५०', *धि इंडियन इकॉनॉमिक अँड सोशल हिस्टरी रिव्ह्यू*, ऑक्टोवर-डिसेंवर, १९९४.

९२. टॉमलिन्सन, वी.आर., *धि इकॉनॉमी ऑफ मॉडर्न इंडिया १८६०-१९७०*, केंब्रिज, १९९३, पृ. ९१.

९३. एल्. वीस (Weiss) अँड जे.एम. हॉब्सन, *स्टेट्स अँड इकॉनॉमिक डेव्हलपमेंट : ए कंपॅरेटिव हिस्टॉरिकल ॲनॅलिसिस*, पोलिटी प्रेस, केंब्रिज, १९९५; गेर्शेनक्रॉन, ए., *इकॉनॉमिक वॅकवर्डनेस इन हिस्टॉरिकल पर्स्पेक्टिव्ह – ए वुक ऑफ एसेज*, द वेल्कनॅप प्रेस ऑफ धि हार्वर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, केंब्रिज, मॅसॅच्युसेट्स, १९६२, प्रकरणे १ व २.

९४. चार्ल्सवर्थ, एन., पृ. २४९.

९५. चार्ल्सवर्थ, एन., पृ. २४४-२४५.

९६. उदाहरणार्थ, रे., डी., *डेव्हलपमेंट इकॉनॉमिक्स*, प्रिन्स्टन युनिव्हर्सिटी प्रेस, प्रिन्स्टन, न्यू जर्सी, १९९८, पृ. ४९-५०.

⌘⌘


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# राष्ट्रांची श्रीमंती आणि गरिबी*

श्री.मा. भावे

(अ) कोलंबसाला सापडलेल्या नव्या भूमीची माहिती छपाईच्या सोईमुळे झपाट्याने पसरली आणि युरोपभर एकच खळबळ माजून राहिली. मार्च १४९३ मध्ये कोलंबस स्पेनला परतला आणि आपल्या मोहिमेचा अहवाल त्याने बादशहाला दिला. त्या अहवालाच्या लागोपाठ तेरा आवृत्त्या निघाल्या. नव्या जगातील आदिवासींना कसे समजून घ्यायचे याची चर्चा धर्मगुरूंनी सुरू केली तर चित्रकारांनी नव्या जगातील देखाव्यांची कल्पनारंजित चित्रे काढली. नकसगिरांनी बेटांचे आणि किनाऱ्यांचे नकाशे काढले. नवीन बेटांवर जाण्याची लगवग सुरू झाली. खाजगी व्यापाऱ्यांनी नवीन प्रवासासाठी जहाजे बांधून ठेवली. स्पेनमध्ये या ना त्या कारणाने संकटात सापडलेल्या लोकांना नवीन आश्रयभूमी लाभली.

नव्या जगाविषयी नव्या दंतकथा निर्माण झाल्या. डोकेच नसलेल्या किंवा कुत्र्याचे डोके असलेल्या माणसांच्या गोष्टी सांगितल्या जाऊ लागल्या. कुणी सोन्याने ओतलेल्या मनुष्यांची गप्प उठवली. पण सर्वांत लोकप्रिय होती ती लढाऊ ॲमेझॉन स्त्रियांची वंदना. 'आम्ही ज्या बेटावर पोचलो होतो, त्याच्या पलीकडच्याच बेटावर या बायका राहतात', अशी खात्रीची माहिती हे परत आलेले खलाशी देऊ लागले. एक आवई तर अशी उठली की, शूर स्पॅनिश पुरुषांपासून मुलगे व्हावेत या इच्छेने दहा हजार ॲमेझॉन स्त्रिया स्पेनला यायला निघाल्या आहेत. या दूरच्या देशात काहीही भेटते व घडू शकते, अशी धारणा पसरली.

आज ज्यांना कॅरिबियन बेटे म्हणतात त्यात स्पॅनिश लोकांनी पहिली पंचवीस वर्षे अक्षरशः धिंगाणा घातला. तिथे त्यांना संपत्ती फारशी लाभली नाही; पण तिथल्या आदिवासींवर त्यांनी नको ते अत्याचार केले. तिथल्या लोकांच्या भांडणात स्पॅनिश लोक उरतले. प्रदेश जिंकून शहरे व वस्त्या आल्या. आदिवासी स्त्रियांशी लग्ने केली, संबंध ठेवले व बलात्कारही केले. अनेक आदिवासींना बाटवले. सोन्याचा ध्यास घेतला व त्यासाठी आदिवासींचा छळ केला.

आ) यानंतर स्पेनची जहाजे अमेरिका खंडात पोचली व तेथे त्यांना अगदी निराळ्या प्रकारचे आदिवासी भेटले. हे लोक कापसाची वस्त्रे नेसत व दगडी घरे बांधून शहरातून राहात. त्यांना लोखंड, तांबे वगैरे कठीण धातू माहीत नव्हते. मात्र त्यांच्यापाशी शस्त्रे होती, गोफणी होत्या, विपारी बाण होते, दगडी फरस बसवलेल्या कुऱ्हाडी होत्या. कॅरिबियन बेटातील आदिवासी भित्रे व बिनलढाऊ होते तसे हे आदिवासी नव्हते. त्यामुळे स्पॅनिशांनी या आदिवासींशी मनमिळाऊ वर्तणूक ठेवली. आदिवासींकडून त्यांना कळले की, किनाऱ्यापासून लांब अंतरावर, डोंगराच्या पलीकडे एक प्रबळ राजा राहतो व त्याच्यापाशी अमाप संपत्ती आहे. या राजाला गोरे लोक आल्याची माहिती कळली होती व त्याने किनाऱ्यावरील या लोकांना सांगितले होते की, गोऱ्या पाहुण्यांना भपकेबाज भेटी देऊन परत पाठवून द्या. पण ही त्या राजाची चूक झाली. गोऱ्यांना जी खा खा सुटली होती, त्याची कल्पना त्याला नव्हती.

एर्नाव्हो कोर्तेझ याच्या नेतृत्वाखालील स्पॅनिश जहाजांचा काफिला मेक्सिकोच्या किनाऱ्याला लागला होता. कोर्तेझ हा बेदरकार, बनेल आणि बायाळू माणूस होता. त्याच्या चंटपणामुळे त्याला स्पेनमध्ये राहाणे अवघड झाल्याने तो ही मोहीम घेऊन आला होता. कोर्तेझ देखणा होता. त्याचे व्यक्तिमत्त्व लाघवी होते. तो कारस्थानी होता व मुत्सद्दीही होता. त्याच्या हाताखालील लोक त्याच्यावर खूष असत. अवघ्या चार-पाच लोकांच्या बळावर त्याने मॉंटेझुमाच्या बलाढ्य ॲझटेक साम्राज्याचा पाडाव केला आणि उत्तर अमेरिकेत युरोपियनांची वसाहत स्थापन केली.

इ) कोर्तेझचे यश त्याच्या हिकमतीचे फळ होते पण ॲझटेक साम्राज्याच्या दुबळेपणाचाही तो परिणाम होता. ॲझटेक साम्राज्य एककेंद्री नव्हते. परस्परांशी लढणाऱ्या अनेक टोळ्यांवर

* प्रा. डेव्हिड एस्. लँडेसकृत *दि वेल्थ ॲंड पॉव्हर्टी ऑफ नेशन्स* या पुस्तकाचा परिचय करून देणारा पहिला लेख ऑगस्ट २००२च्या अंकात प्रसिद्ध झाला होता. त्याच मालिकेतील हा दुसरा लेख – *संपादक*

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

एका सम्राटाने मांडलिकत्व लादून ते साम्राज्य उभारले होते. त्यामुळे प्रजेला सम्राटाविषयी निष्ठा नव्हती आणि मध्यवर्ती सत्तेला प्रतिष्ठा नव्हती. बळजोरी करून मांडलिकांकडून द्रव्य उकळणे हाच जेव्हा मध्यवर्ती सत्तेचा उद्योग असतो तेव्हा एक मुजोर सत्ताधारी जाऊन दुसरा मुजोर सत्ताधारी येत असला, तरी तो बदल जनतेला हवासा वाटतो; कारण त्या बदलाने आपल्या हालात फरक पडेल अशी आशा जनतेला वाटत असते.

ॲझटेक ही टोळी उत्तरेकडून मेक्सिकोत उतरली होती. त्यांना मेक्सिकोत कुणी थारा दिला नाही. मेक्सिकोच्या किनाऱ्यावर एक तलाव आहे. त्या तलावाकाठी राहणाऱ्या शेतकऱ्यांनी या ॲझटेक लोकांना आपले गुलाम म्हणून ठेवून घेतले व ते ॲझटेकांनी पत्करले. इथे राहात असताना ॲझटेकांना सत्ता व तिच्यासाठी चालणारे संघर्ष यांची माहिती झाली. या शेतकरी लोकांच्या कचाट्यातून सुटून ॲझटेक पाणथळ जागेत लपून राहिले. तिथे त्यांची संख्या वाढल्यावर ते पुन्हा मैदानात आले व नंतर एकेका टोळीला नमवून त्यांनी मध्यवर्ती सत्ता काबीज केली.

अमेरिकेतील आदिवासीत नरबळी देण्याची प्रथा सर्रास होती. पण हे बळी उत्सव-यात्रेच्या काळात तुरळक दिले जात. ॲझटेक सत्तेवर आल्यावर त्यांनी आपल्या टोळीचा देव पुढे आणून त्याला हजारो लोकांचे बळी देण्याचे उत्सव सुरू केले. जिवंत माणसांची हृदये उपसून त्यांच्या रक्ताचे अभिषेक या देवाला द्यायची प्रथा त्यांनी आणली. नरबळींच्या उरलेल्या अवयवांच्या मेजवान्या सत्ताधारी लोकांत होऊ लागल्या. ह्या भयानक नरसंहारामुळे ॲझटेकांचा दरारा वाढला पण त्यांचे शत्रूही अधिक कडवे बनले. पण हे नरबळी आणायचे कोठून? त्यासाठी ॲझटेकांनी इतर टोळ्यांच्या पुढाऱ्यांशी नरबळी पुरवण्याचे गुप्त करार केले. ॲझटेकांचा एक प्रतिनिधी व दुसऱ्या टोळीचा प्रतिनिधी यांनी लुटुपुटीचे द्वंद्व करायचे, दुसऱ्या टोळीच्या प्रतिनिधीने पराभव स्वीकारायचा व या हरलेल्या टोळीतील लोकांना खंडणी म्हणून नरबळी पुरवायचे, असा व्यवहार सुरू झाला.

अलीकडचे साम्राज्यविरोधी इतिहासकार ॲझटेकांच्या नरमांसभक्षणाकडे दुर्लक्ष करतात किंवा ही सगळी स्पॅनिश आक्रमकांनी उठविलेली गप्प आहे, असे म्हणतात. पण इतिहास असा झाकता येत नाही. ॲझटेक हे नरबळी देत व नरमांसभक्षण करीत ही खरीच गोष्ट आहे. तीमुळे स्पॅनिश लोकांच्या साम्राज्यवादाचे समर्थन होत नाही. पण ॲझटेक साम्राज्य दुबळे का होते, याची मीमांसा करता येते. ॲझटेकांच्या शत्रूंनी कोर्टेझला अंतस्थ माहिती तर पुरवलीच पण स्पॅनिश लोकांचे सामान घाटातून वाहून नेण्यास मदत केली. या शत्रूंनीच कोर्टेझला मेक्सिकोच्या राजधानीत नेऊन पोचवले.

नंतरची हकीकत सर्वज्ञात आहे. तुंबळ लढाई झाली. ॲझटेक चिवटपणाने व जीव खाऊन लढले. पण त्यांच्या लाकडी व दगडी हत्यारांचे स्पॅनिशांच्या भाल्या-तलवारींपुढे काही चालले नाही. लोखंडी शस्त्रे आणि हुकमी व चपळ हालचाल करणारे घोडे यांच्या साहाय्याने मूठभर स्पॅनिशांनी हजारो ॲझटेक वीरांचे प्रबळ सैन्य धुळीला मिळाले. त्यानंतर स्पॅनिशांच्या मेक्सिकोतील वस्तीमुळे स्पॅनिशांनी युरोपातून आणलेले रोगजंतू पसरून शेकडो आदिवासी साथीच्या रोगांना बळी पडले.

ई) पेरूतील इंकांच्या साम्राज्याचा नाश पिझारोने केला. इंकांचे साम्राज्यही केंद्रवर्ती सम्राट व त्याचे मांडलिक अशा स्वरूपाचेच होते. इंका टोळी सत्तेवर होती व तिने बाकीच्या टोळ्यांना दाबून टाकले होते. या मांडलिक टोळ्या इंकांविरुद्ध धुमसतच होत्या. खुद्द इंकांमध्येही भांडणे होतीच. स्पॅनिश लोकांनी या भाऊबंदकीचा फायदा उठवला व ते मूठभर सैन्य किनाऱ्यावरून घाट चढून काजामार्का या ठिकाणी पोचले. त्यांनी इंकांचा राजपुत्र अटाहुअल्पा याला सन्मानाने भेटीला बोलावले. स्पॅनिश लोक इतके थोडे होते की, ते दगा करतील असे इंकांना वाटलेच नाही. त्यातून आपले काही सैन्य त्यांनी जंगलात लपवून ठेवले. इंकांना वाटत होते की, स्पॅनिश घाबरले आहेत; व ते खरेच होते. अनेक स्पॅनिश सैनिकांच्या तुमानी ओल्या झाल्या होत्या.

हजारो इंका स्पॅनिश छावणीत आले. अटाहुअल्पाचा मेणा इंका सरदारांनी खांद्यावरून तंबूत आणला. एका ख्रिस्ती धर्मगुरूने अटाहुअस्पाच्या हाती बायबल दिले. अटाहुअल्पाने ते उघडले, एक नजर फिरवली आणि बायबल जमिनीवर टाकून दिले. त्या धर्मगुरूने आरोळी ठोकली, 'सद्धार्मिकांनो, इकडे या; या कुत्र्याने देवाचा ग्रंथ जमिनीवर टाकून दिला आहे!' स्पॅनिशांनी इंकांवर चाल केली. चपळ घोडे, तलवारी व ढाली यांच्यापुढे इंकांचे काही चालले नाही. सात हजार इंका जागच्या जागी मेले. अटाहुअल्पा कैद झाला. त्याच्या

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सुटकेसाठी एक दिवाणखाना गच्च भरेल इतके सोने खंडणी म्हणून मागितले. इंकांनी इतके सोने दिले, तरी पिझारोने अटाहुअल्पाला नावापुरते सोडून पुन्हा कैद केले. स्पॅनिश राजाशी द्रोह केल्याच्या आरोपावरून त्याला ठार मारून टाकले. त्यापूर्वी त्याला बाटवून ख्रिस्ती केले होते.

युरोपियनांची लबाडी, क्रूरपणा, पैशाची हाव यांचा अर्क आपल्याला या प्रसंगात पाहायला मिळतो. खुद्द इंकाही सज्जनपणाचे पुतळे नव्हते. पिझारो पेरूला पोचला त्याच सुमाराला अटाहुअल्पाचा बाप सम्राट कापाक याने इंकांविरुद्ध बंड केलेल्या एका टोळीच्या वीस हजार जवानांना ठार मारून त्यांची प्रेते एका तलावात टाकली होती. दुसरे असे की, इंका लोक तरी असे फसले कसे? काही इतिहासकारांचे म्हणणे असे की, निरक्षर समाज कितीही हिकमती असला, तरी साक्षर समाजाच्या कारस्थानांना तो तोंड देऊ शकत नाही. हीच गोष्ट इंकांच्या बाबतीत खरी आहे. माणसे किती दुष्ट असतात याविषयीचा स्पॅनिश लोकांचा अनुभव दांडगा होता; त्या मानाने इंकांची दुष्टपणाची कल्पना तुटपुंजी होती!

ॲझटेकांपेक्षा इंकांनी स्पॅनिश आक्रमकांना जास्त नेटाने तोंड दिले. १५३२ साली अटाहुअल्पाचा पराभव झाला. पण इंकांचे समूळ उच्चाटन होण्यास १५७२ साल उजाडावे लागले. पेरूतील आदिवासींचा शेवटही स्पॅनिश लोकांच्या हल्ल्यापेक्षा त्यांनी मानलेल्या रोगराईमुळे झाला. आजही इंकांचे वंशज मौजूद आहेत. पण गोऱ्या लोकांशी लग्नसंबंध, व्यवहारसंबंध आणि प्रशासकीय नोकऱ्या यांच्या योगाने एकरूप होऊन गेले आहेत.

**कॅरिबियन बेटे**

(अ) कोलंबस पहिल्यांदा कॅरिबियन बेटांपैकी हैती या बेटाला पोचला होता. ही बेटे स्पेनच्याच ताब्यात होती. नंतरच्या २५-३० वर्षांत दक्षिण अमेरिकेचे घबाड स्पेनला लाभले. त्यानंतर पोर्तुगीज कॅरिबियन द्वीपसमूहात आले व सोन्याच्या शोधात दक्षिण अमेरिकेत पोचले. ब्राझीलमध्ये त्यांनी साम्राज्य स्थापले. स्पेन व पोर्तुगाल या दोघांनाही सोन्याची जबरदस्त हाव होती. त्यामुळे कॅरिबियन बेटांत वसाहती कराव्यात आणि तिथे दुसऱ्या कोणत्या तरी वस्तूंचे उत्पादन करावे अशी बुद्धी त्यांना झाली नाही. दक्षिण अमेरिकेतील संपत्ती स्वदेशी नेण्याच्या वाटेवरील चौक्या म्हणून त्यांनी या बेटांचा उपयोग केला.

स्पॅनिश खजिन्यावर झडप घालायला डच, फ्रेंच व इंग्रज टपूनच बसले होते. सोळाव्या शतकाच्या उत्तरार्धात या देशाच्या चाच्यांनी ॲटलांटिकमध्ये धुमाकूळ घातला व स्पॅनिश जहाजे लुटून नेली. या उद्योगात असताना त्यांनी कॅरिबियन बेटांवर कब्जा केला. डच, फ्रेंच, इंग्रज यांनी मात्र इथे वसाहती स्थापन केल्या व तंबाखू, तीळ, कापूस यांची लागवड केली. त्यानंतर डचांनी उसाचे पीक या बेटात आणून साखरेचे कारखाने घातले. त्यामुळे या बेटांचा चेहरा-मोहराच बदलून गेला. साखरेच्या उत्पादनासाठी अमाप भांडवल लागते. उसाचे चरक, रस उकळण्याच्या कढया (बॉयलर्स), ऊर्ध्वपातनाची उपकरणी (स्टिल्स), उसाचे मळे यासाठी किंमत मोजावी लागतेच. पण मुख्य लागतात ते मजूर. हे मजूर मिळवण्यासाठी नाना खटपटी कराव्या लागल्या. युरोपातून करारी गोरे मजूर (इन्डेंचर्ड लेबर) आणले, आदिवासींना मजूर म्हणून वापरून बघितले पण या कामाच्या धबडग्याला कोणी टिकेना. शेवटी आफ्रिकेतील निग्रोंना गुलाम करून आणले. त्यांची संतती वाढून मजुरांचा कायमचा पुरवठा होईल अशी अपेक्षा होती. पण तसेही झाले नाही. गुलामांची सतत आयात करावी लागली.

आ) तीनशे वर्षांत जवळजवळ एक कोटी मनुष्ये आयात केली गेली असतील. हे एक कोटी लोक इष्ट स्थळी पोचले; पण त्यासाठी मुळात आफ्रिकेत किती लोकांना पकडले असेल याची कल्पनाच केली पाहिजे. कारण, पकडल्या ठिकाणापासून किनाऱ्यावर आणताना, किनाऱ्यावरील छावण्यांत जहाजे येण्याची वाट पाहात असताना व नंतर, खुद्द जहाजावर शेकड्यांनी माणसे मरत. आफ्रिका ते अमेरिका हा जो गुलाम नेणाऱ्या जहाजांचा मार्ग होता त्याला मिडल-पॅसेज असे म्हणत. (नैपॉल यांनी आपल्या प्रवासवर्णनाच्या एक पुस्तकाला हेच नाव दिले आहे.) या जहाजावर स्तबका (डेक) खालच्या कोठडीत गुलाम कोंबून भरलेले असत. तेथील कोंदट राहाणी, मूत्र व विष्टा यांचा चिखल, रोगराई यामुळे निम्मे गुलाम मरत.

प्रत्येक गुलामवाहू जहाजाच्या सोबतीला शार्क माशांचा जथा असे. मेलेल्या गुलामांना समुद्रात फेकून देत व त्यांची मेजवानी माशांना मिळे. या जहाजांची दुर्गंधी मैलोन् मैल पसरे व जहाज किनाऱ्याला लागण्याच्या आधीच या दुर्गंधीमुळे त्याची वर्दी किनाऱ्यावर पोचे. ही घाण जहाजाला कायमचीच लगटलेली असे. जहाजे गुलामांच्या व्यापारातून काढून टाकली तरी ती जहाजांना चिकटून राही. आता ही गोष्ट खरी की,





अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अमेरिकेत गुलाम चांगल्या स्थितीत पोचल्यास त्यांना जास्त किंमत येई. त्यामुळे बरेच व्यापारी आपली जहाजे स्वच्छ ठेवण्याच्या प्रयत्नात असत.

गुलामांना विकत घेतल्यावर त्यांचे मालक काही काळ त्यांना 'माणसाळवण्यात' घालवीत. जे कमजोर गुलाम असत त्यांना बाजूला काढीत आणि वांड गुलामांना ठोकून सरळ करीत. पळून जाणाऱ्या गुलामांना बहुधा त्याचे सोबती गुलामच पकडून देत; कारण एक गुलाम कमी झाला तर इतरांचे काम वाढत असे. बहुतेक जुलमी व्यवस्था ह्या बळींच्या सहकार्यावरच चालत राहतात. काम अगदी पिळून काढणारे असे. प्रत्येक प्रक्रियेचे अगदी लहान तुकडे करून एकाच तुकड्यातील काम त्या गुलामाकडून वर्षामागून वर्षे करून घेण्यात येई. गुलामाला फुरसद मिळून द्यायची नाही, सतत कामात गुंतवून ठेवायचे, हा यातील हेतू होता. पीक तोडणीच्या वेळी कामाची गर्दी असे. त्या वेळी चाबकाचे फटकारे मारून काम करून घेत. गुलाम या छळापायी मेला तर मालकाला दंड होत असे, पण व्यवहारात ही शिक्षा क्वचितच अमलात येई. या सगळ्या पिळवणुकीमुळे गुलामांची नवी उपज होऊन त्यांची संख्या वाढली असे कधी झालेच नाही.

(इ) कॅरिबियनमधील साखरउद्योगाचा युरोप-अमेरिकेच्या अर्थव्यवस्थेला आणि युरोपातील उद्योगीकरणाला काय फायदा झाला याबद्दलचा वाद बराच काळ चालला आहे. गुलामांच्या छळावर उभ्या असणाऱ्या या उद्योगामुळेच इंग्लंडची औद्योगिक क्रांती होऊ शकली अशी एक टोकाची भूमिका आहे, तर दुसरीकडे काही विद्वान गुलामांच्या व्यापाराच्या अर्थकारणाचा हिशेब मांडून असे सांगतात की, या व्यापारापासून झालेला नफा अगदीच थोडा होता.

खरी गोष्ट ही आहे की, साखरउद्योग व व्यापार यांच्या चक्रातील गुलामांचा व्यापार हा फक्त एक भाग होता — ऊस-मळेवाले व साखरकारखानदार युरोपात साखर पाठवीत व स्वत:साठी आणि गुलामांसाठी लागणारे अन्न उत्तर अमेरिकेतून किंवा युरोपातून आणवीत. त्याचबरोबर कापड, भांडी, पत्रे, खिळे, तोफा, बंदुका, काचसामान, यंत्रे व शस्त्रे इत्यादी सर्व सामान युरोपातून येत असे. खेरीज गुलामांचे व्यापारी गुलामांची किंमत म्हणून युरोपातील वस्तूच विनिमयादाखल देत. असा हा जंगी उद्योग दोनशेहून जास्त वर्षे चालला होता. त्यापासून इंग्लंडमधील किंवा युरोपातील उद्योगांना लागणारे भांडवल फारसे निर्माण झाले नाही. कारण या उद्योगाचे मूलाधार जे मळेवाले ते आपला पैसा उद्योगात क्वचितच गुंतवीत. ते आपले अतिरिक्त पैसे शेतीत घालत किंवा 'सर', 'लॉर्ड' वगैरे पदव्या विकत घेत अगर ऐषाराम करीत. पण कॅरिबियन व्यापाराच्या योगाने बाजारपेठेचा विस्तार झाला व त्याचा फायदा इंग्लंडला मिळाला. उदा., कापसाचे कापड करण्याचा उद्योग या कॅरिबियन व्यापारामुळे भरभराटीला आला.

प्रश्न असा आहे की, गुलामांचा व्यापार नसता, तर औद्योगिक क्रांती झाली असती का? लँडेस यांचे उत्तर आहे की, झाली असती, पण वेळ लागला असता. वर आपण पाहिले की, कॅरिबियन उद्योग गुलामांवर चालला होता व या उद्योगामुळे बाजारपेठ वाढली. एक स्थिरचित्र म्हणून बाजारपेठेकडे पाहिले, तर असे दिसेल की, त्या बाजारपेठेतील मुख्य ग्राहक युरोपीयच होता. अमेरिका (त्यातच कॅरिबियन बेटे आली) त्या बाजारपेठेतील थोडाच माल उचलीत होती. मात्र आपण ४०-५० वर्षांच्या आधीचे चलच्चित्र या परिप्रेक्ष्यातून ह्या त्रिकोणी व्यापाराचे अवलोकन केले तर ध्यानात येते की, युरोपच्या अंतस्थ बाजारपेठेपेक्षा हा व्यापार फार अधिक वेगाने वाढत होता. म्हणून लँडेस यांचे मत आहे की, साखर उद्योगामुळे व्यापारात जी वाढ झाली ती औद्योगिक क्रांतीला पुरेशी होती, असे स्पष्ट म्हणता न आले, तरी या उद्योगाचा औद्योगिक क्रांतीशी संबंध नव्हताच, असेही म्हणता येणार नाही.

**आशियातील साम्राज्ये**

(अ) पोर्तुगाल, हॉलंड व इंग्लंड या युरोपातील देशांनी आशियात साम्राज्ये स्थापन केली. त्यांचा राजकीय इतिहास सर्वांनाच माहीत आहे. तथापि या साम्राज्यांमुळे हे साम्राज्यवादी देश समृद्ध झाले काय, याविषयी प्रा. लँडेस यांनी काही महत्त्वाच्या नोंदी केल्या आहेत.

पोर्तुगीजांनी मसाल्याच्या व्यापारावर कब्जा बसवला व युरोपला जाणाऱ्या मसाल्यांपैकी ४०% मसाला पोर्तुगीज जहाजातून जाई. त्यामुळे अरब व इटालियन यांच्या मार्फत जो खुष्कीचा व्यापार चाले त्यावर सुरुवातीला आघात झाला. पण नंतर या दोन देशांच्या व्यापाऱ्यांनी पुन्हा उचल खाल्ली व पोर्तुगीजांचा मसाल्याच्या व्यापारातील वाटा २०% वर आला. त्यानंतर पोर्तुगीजांनी आशिया खंडाचा जो अंतर्गत व्यापार








मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

चाले त्यात लक्ष घालते. स्वतःच्या जहाजातून ते मालाची ने-आण करीतच पण आपली दस्तके इतरांच्या जहाजांनी घेतली नसतील, तर त्या जहाजांना ते जा-ये करू देत नसत. या दस्तकांच्या शुल्कातूनच त्यांनी भरमसाट पैसा मिळवला. पण पोर्तुगीज दस्तकांचा अंमल चालू राह्यचा तर त्याला जवरदस्त नाविक बळ हवे. हे आरमार पोर्तुगीजांनी हिंदुस्थानातच उभारले. त्यांनी इथेच जहाज-बांधणीचे कारखाने घातले व स्थानिक खलाशांची भरती केली. अशा रीतीने पोर्तुगीज ही एक आशियाई सत्ताच झाली, असे म्हणता येईल.

पण पोर्तुगीजांची ही संधी फार काळ चालली नाही. इंग्रज व डच यांनी पोर्तुगीजांचे वर्चस्व संपुष्टात आणले व पोर्तुगीज सत्ता काही फुटकळ जागांवरच उरली. पोर्तुगीजांचा हा ऱ्हास होण्याचे कारण म्हणजे त्यांनी ज्ञानाची उपासना थांबवली व धार्मिक कट्टरपणाचा स्वीकार केला. १५२० पासून पोर्तुगाल आणि स्पेन या दोन्ही देशांनी इतर युरोपियन देशांपासून स्वतःला कोंडून घेतले. आपले विद्यार्थी परदेशात शिकायला पाठवणे त्यांनी बंद केले व परकी पुस्तकांच्या आयातीवर, ती पाखंडी असतील या संशयावरून बंदी घातली. ज्ञानाच्या व्यवहारावर धर्मगुरू व धर्मसंस्था यांच्यापुरता पगडा बसला. थोड्याच काळात पोर्तुगीजांचा अडाणीपणा हा युरोपात थट्टेचा विषय होऊन बसला. अनेक प्रवाशांनी असे लिहून ठेवले आहे की, जिज्ञासा, स्वतंत्र विचार व परंपरेला आव्हान देण्याची शक्ती पोर्तुगीजांच्या ठिकाणी उरलेली नाही. परिणाम असा झाला की, सन १७०० च्या सुमारास पोर्तुगाल हे एक दुबळे व मागास राष्ट्र झाले. वस्तूंच्या व्यापारापासून होणाऱ्या फायद्यापेक्षा कल्पनांच्या देवघेवीतून होणारी मिळकत जास्त महत्त्वाची असते. जुन्या काळी पोर्तुगालमधील पंडित हे ज्यू असत. आता पोर्तुगीजांनी त्यांना हाकलून दिले. सारांश, कट्टर धार्मिकपणा, ज्ञानोपासनेला दिलेला पूर्णविराम व परक्यांविषयीची असहिष्णुता यांच्या योगाने पोर्तुगॉलचा उत्कर्ष थांबला; एवढेच नाही तर तो देश अधोगतीला लागला.

आ) हॉलंड या देशावर स्पेनचा कब्जा होता व जवळजवळ ऐंशी वर्षे हॉलंडने स्पेनविरुद्ध स्वातंत्र्याचा लढा चालू ठेवला. या लढ्यातूनच हॉलंड हे बलशाली राष्ट्र झाले. १६०९ साली स्पेनने हॉलंडमधून माघार घेतली. त्यापूर्वीच म्हणजे १६०२ साली डचांनी आशियाई व्यापारासाठी 'व्हीओसी' ही आद्याक्षरे असलेली व्यापारी पेढी सुरू केली होती. या पेढीने आजच्या इंडोनेशिया देशावर राज्य स्थापन केले व मसाल्याच्या व्यापारात आघाडी घेतली. कॉफी व लवंगा या पिकांच्या बाबतीत डचांनी स्थानिक लोकांची जी पिळवणूक केली ती पाहण्यासारखी आहे.

आम्बोआना या बेटावर लवंगा मिळवायच्या असे ठरवून इतर बेटांवरील लोकांना डचांनी आम्बोआनाला आणले. व्हीओसीने सांगितले की, लवंगांचे पीक घेण्याचा मान फक्त आम्बोआनाचा. त्यामुळे इतर बेटांवरील लवंगांची झाडे तोडून टाकण्यात आली. या 'माना'च्या बदल्यात आम्बोआनातील जनतेवर काही अटी व्हीओसीने लादल्या. त्या अशा की, लवंगा फक्त व्हीओसीलाच व व्हीओसी ठरवील त्या दराने विकायच्या. आम्बोआनातील लोकांना जे अन्नपदार्थ लागतील ते व्हीओसीकडूनच विकत घेतले पाहिजेत. पुढे जागतिक बाजारात लवंगांच्या जशा किमती ठरतील त्याप्रमाणे लवंगांचे उत्पन्न वाढवण्याची/कमी करण्याची सक्ती व्हीओसी करू लागली. १६५६ साली 'लवंगांची झाडे लावा' असे फर्मान निघाले तर १६९२ व १६९७ साली ही झाडे तोडायला लावली. या धरसोडीला कंटाळून शेतकरी आम्बोआनातून पळून गेले. लोकसंख्या मूळच्या लोकसंख्येच्या तिसऱ्या हिश्श्यानेही राहिली नाही.

हीच गोष्ट कॉफीची. व्हीओसीने ठरवले की, जावा बेटात कॉफीची लागवड करायची. १६९६ साली व्हीओसीने शेतकऱ्यांना एक पौंड कॉफीला १० स्टीव्हर असा भाव दिला. त्यामुळे शेतकऱ्यांना हुरूप आला. पुढे व्हीओसीने किमती उतरवत पौंडाला फक्त २।। स्टीव्हस् इतकी किरकोळ किंमत दिली. त्यावर शेतकऱ्यांनी शिक्षेची पर्वा न करता कॉफीची झाडे तोडायला सुरुवात केली. तेव्हा व्हीओसीने किंमत वाढवून कॉफी लावण्याची सक्ती शेतकऱ्यांवर केली. नंतर मिऱ्याला बरी किंमत येऊ लागल्यामुळे कॉफीची झाडे तोडा, मिऱ्याचे मळे वाढवा असा लकडा सुरू केला. कॉफीची झाडे वाढायला चार वर्षे लागतात.

(ड) पोर्तुगीज व डच हिंदुस्थानात आले ते मसाल्याच्या पदार्थांसाठी. पण इंग्रजांनी इतर जिन्नसांचा व्यापारही सुरू केला. त्यांपैकी महत्त्वाची वस्तू कापड. ढाक्क्याची मलमल इंग्रजांनी युरोपीय बाजारात आणली. ईस्ट इंडिया कंपनीने १६२५ साली कापडाचे दोन लाख तागे निर्यात केले तर १६८० साली सात लाख तागे. भारतीय कापसाने युरोपचा




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

चेहरा-मोहराच बदलून गेला. पूर्वी युरोप लोकरीचे कपडे वापरी. पण कापसाच्या कपड्यांत अनेक गुण होते. हे कपडे तलम, हलके, स्वच्छ, लवकर काढता-घालता येणारे, रंगीबेरंगी व सुंदर असत. हे कपडे अमेरिकेत व कॅरिबियन बेटांत फारच लोकप्रिय झाले. खेरीज इंग्रजांनी रेशीम, नीळ, सॉल्टपीटर यांचीही निर्यात केली.

अठराव्या शतकातील भारतीय समाजाची आर्थिक स्थिती काय होती? बहुतेक परदेशी प्रवाशांनी असे नमूद केले आहे की, भारतीय रयत दारिद्र्यात जगत होती. उत्पादन खूप होते व गरजा अगदी प्राथमिक होत्या. त्यामुळे बचत पुष्कळ होत असे. पण ही बचत राजे-रजवाडे आणि शेठ-सावकार यांच्या खिशात जाई. हल्ली काही इतिहासकार हिशेब मांडून असे दाखवू पाहतात की, १८व्या शतकातील हिंदी रयत इंग्लंडमधील शेतमजुरांपेक्षा अधिक सुखात होती. तथापि लँडेस यांना हे हिशेब विश्वसनीय वाटत नाहीत. ते म्हणतात, या आकडेमोडीचा अभ्यास ऐतिहासिक परिस्थितीच्या संदर्भात केला पाहिजे. भारतीय जनतेला मालमत्तेचा अतिशय संकुचित अधिकार होता, देशभर अंदाधुंदी होती व तंत्रज्ञान अविकसित होते. उलट युरोपातील राष्ट्रे नवीन तंत्रज्ञान शोधीत होती आणि उत्पादन वाढवीत होती. खाजगी मालमत्ता बहुतांशी सुरक्षित होती.

लँडेस यांचा तिसरा शेरा येथील साक्षरतेविषयी आहे. १८व्या शतकातील हिंदी अर्थव्यवस्थेविषयी जी माहिती आहे, ती युरोपीय लोकांच्या लिखाणातून व दफ्तरातून आलेली आहे. या बाबतीतला भारतीय पुरावा अगदीच किरकोळ आहे. खरे तर भारतीय लोक साक्षर होते, कागदाची कमतरता नव्हती. मग असे का व्हावे? असे म्हणता येईल की, भारतीय राजवटी अस्थिर होत्या व त्यांची दफ्तरे अंदाधुंदीत नाहीशी झाली. पण खरे म्हणजे भारतीयांची साक्षरता ही व्यवसायाशी निगडित होती. धर्मगुरू, प्रशासक, व्यापारी इतक्यांपुरतीच साक्षरता मर्यादित होती. पाश्चात्त्य समाजातही साक्षरांची संख्या मोठी नसली तरी ती सर्व गटांतून पोचली होती व व्यवसाया-व्यतिरिक्त क्षेत्रांतही लिखाणाचा वापर करण्याची सवय समाजात पसरली होती. त्यामुळे युरोपातील बहुतेक साक्षर लोक लिहीत व ते लिखाण प्रकाशितही करीत. याहून महत्त्वाची गोष्ट म्हणजे युरोपीय समाज चौकस होता. माहिती मिळवायची, तिची पद्धतशीर मांडणी करावयाची व ती प्रसिद्ध करायची, असा छंदच साक्षर घटकांना लागला होता.

भारतीय अर्थव्यवस्थेविषयी पाश्चात्त्यांचा जो पुरावा आहे त्याबद्दल पौर्वात्य पंडित असा विचार मांडतात की, हा पुरावा उपयोगाचा नाही. तो उठवळ, एकतर्फी व पूर्वग्रहदूषित आहे. पौर्वात्य समाजाचे इंगित या उडत्या पाखरांना समजण्यातले नव्हतेच. याबद्दल लँडेस म्हणतात की, "एखाद्या समाजाची घडण बाहेरच्या माणसाला कळणारच नाही, हा दावा चुकीचा आहे. पाश्चात्त्यांनी दिलेला पुरावा नाकारण्यासाठी या दाव्याचा उपयोग करणे, हा बावळटपणा होईल. पण हा पुरावा तपासून पाहिला पाहिजे इतका आग्रह धरण्याचाच या दाव्याचा हेतू असेल, तर त्यात मुद्दा आहे."

### साम्राज्यशाहीचा जमाखर्च

(अ) सतराव्या शतकात स्पेन व पोर्तुगाल यांनी पश्चिम गोलार्धात आपली साम्राज्ये उभी केली. हॉलंड व इंग्लंड हे देश साम्राज्यविस्तार व संपत्ती या बाबतीत पहिल्या दोन देशांच्या मागे होते. पण व्यापारात त्यांनी मोठीच आघाडी घेतली होती. १८व्या शतकात इंग्लंड व हॉलंड यांनी आपली साम्राज्ये आशिया, आफ्रिका, ऑस्ट्रेलिया व अमेरिका अशा चारी खंडांत पसरविली. साम्राज्यशाहीची अशी दोन रूपे आपणांस पाहावयास मिळतात. साम्राज्यकर्त्यांवर या प्रत्येक रूपाचे झालेले परिणामही वेगवेगळे आहेत. स्पेन व पोर्तुगॉल ही राष्ट्रे पुन्हा गरीब देशांच्या पंक्तीत जाऊन बसली; उलट, साम्राज्ये संपल्यावरही हॉलंड व इंग्लंड हे देश संपन्न स्थितीत आहेत. असे का झाले?

साम्राज्यशाहीचे काही दुय्यम परिणामही झाले. अमेरिकेचा शोध लागल्यावर तेथील मका, कोको, बटाटे, रताळी, तंबाखू, कोका (ज्याच्यापासून आता कोकाकोला बनवतात) व रबर इतक्या वनस्पती युरोपात आल्या व तेथून जगभर पसरल्या. बटाट्याने तर युरोपचे राहणीमानच बदलून टाकले. काही इतिहासकारांचे म्हणणे आहे की, युरोपात १९व्या शतकात लोकसंख्येची जी वाढ झाली त्याचे कारण बटाट्याचे पीक खाण्याला उपलब्ध होते हे आहे. चीनमध्येदेखील बटाटा हा पदार्थ तांदळाइतकाच आहाराचा मुख्य घटक बनला. उलट, युरोपातील कित्येक वनस्पती व घोडा, गाय, मेंढी, कुत्रा हे प्राणी अमेरिकेत पोचले. ही देवाण-घेवाण फायद्याची झाली तरी रोग व साथी यांचा 'विनिमय' हानिकारक ठरले. देवी, कांजिण्या, थंडीताप, घटसर्प इत्यादी आजार युरोपातून अमेरिकेत



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

गेले व तेथील आदिवासी त्या रोगांनी मारून टाकले. उलट, 'सिफिलिस'सारखा गुप्त रोग अमेरिकेतून युरोपात आला (यावरून मतभेद आहेत.). युरोपीय लोक जिथे गेले तेथील हवामानाचा व अन्नपाण्याचा सराव नसल्याने त्यांचीही प्राणहानी मोठी झाली.

(आ) साम्राज्यशाहीच्या पहिल्या अंकात साम्राज्यकर्त्यांना जी संपत्ती मिळाली ती लूट किंवा खंडणी अशा स्वरूपाची होती. स्पेन व पोर्तुगाल इथे सोन्याचा धूर निघू लागला. स्पेनने ही संपत्ती लढायांत, चैनीत व ऐषारामात खर्च केली. सोन्या-रूप्याच्या स्वरूपात जो पैसा स्पेनमध्ये आला तो वापरण्याचा शहाणपणा स्पेनकडे नव्हता. हा शहाणपणा अनुभवांतून येत असतो. स्पेनने नवीन उद्योग सुरू केले नाहीत. शेती सुधारली नाही. कारखाने घातले नाहीत. पैसा द्या व लागेल तो जिन्नस परदेशातून आणा, असा स्पेनचा खाक्या होता. अमेरिकेतून येणारे सोने थांबण्याच्या आधीच स्पेनच्या सरकारला तीनदा दिवाळे पुकारावे लागले होते!

इंग्लंड व हॉलंड यांची गोष्ट निराळी होती. नवीन जगाच्या शोधामुळे त्यांच्या उद्योगाला व व्यापाराला मोठी बरकत आली. मासेमारी, व्हेलचे तेल काढणे, अमेरिकेतून धान्य आणून युरोपात विकणे, कापड विणणे, लोखंडाच्या भट्ट्या घालणे व वस्तू तयार करणे, (फार नंतर) पेट्रोलच्या खाणी खपणे असे नाना उद्योग त्यांनी सुरू केले व भरभराटीस नेले. त्यांनी लुटालूट केली नाही किंवा अंकित समाजांना लुबाडले नाही असे नाही पण त्यांच्या समृद्धीचे बीज त्यांच्या उद्योगात व व्यापारात होते. संपत्तीपेक्षा उद्योग व वैभवापेक्षा मिळकत ही महत्त्वाची असते.

(इ) एका बाजूला स्पेन-पोर्तुगाल व दुसऱ्या बाजूला इंग्लंड-हॉलंड यांच्या भवितव्यात हा फरक का पडला याचे उत्तर शोधण्याचा प्रयत्न मॅक्स वेबर या समाजशास्त्रज्ञाने १९०४-०५ साली आपल्या *द प्रॉटेस्टंट एथिक ॲण्ड द स्पिरिट ऑफ कॅपिटॅलिझम* या निबंधात केला. वेबरचे म्हणणे असे की, प्रॉटेस्टंट पंथाच्या शिकवणुकीमुळे उत्तर युरोपीय समाजात भांडवलाचा संचय करणे व ते कारखानदारीत गुंतवणे ही वृत्ती रुजली. या प्रॉटेस्टंटांपैकी कॅल्व्हिनचा एक उपपंथ आहे. याची शिकवणूक अशी होती की, एखाद्या माणसाला मुक्ती मिळायची की नाही, हे आधीच ठरलेले आहे. ते तो मनुष्य पुण्यकर वागतो की पापकर वागतो यावर अवलंबून नाही. मात्र तुमच्या नशिबात मुक्ती लिहिली असेल, तर ते तुमच्या सुयोग्य वर्तनातून कळून येते! या शिकवणुकीमुळे या पंथाच्या अनुयायांना चांगल्या वागणुकीसाठी मोठेच प्रोत्साहन मिळाले. या बोधातील नशिबासंबंधीचा भाग पुढे गळून पडला पण सद्वर्तनक्रम या पंथाच्या लोकांच्या अंगी बाणला. कामसू वृत्ती, प्रामाणिकपणा, निरलसता, पैसा व वेळ यांची काटकसर हे सद्‌गुण समाजात रुजले. वेबरचे प्रतिपादन असे होते की, या वर्तनक्रमातून नवा भांडवलदार वर्ग उदयाला आला. या वर्गाचा उद्देश पैसा मिळवणे हा नव्हता, तर एका विशिष्ट तत्त्वाला धरून जगणे, हा होता.

वेबरचे हे विवेचन लँडेस यांना पूर्णपणे मान्य आहे. त्यांनी असे म्हटले आहे की, प्रॉटेस्टंट बँकर्स व उत्पादक यांनी व्यापार, बँकिंग व कारखानदारी यांत मोठे यश मिळवले. इंग्लंड व हॉलंड सोडले तरी फ्रान्स व जर्मनी या देशांतही कारखानदारी व व्यापार यावर प्रॉटेस्टंटांचेच वर्चस्व होते. भांडवलदारी वृत्ती किंवा स्वभाव एखाद-दुसऱ्या व्यक्तीत योगायोगाने आढळेलही पण भांडवलदारी जीवनक्रम एखाद्या समाजाच्या अंगवळणी पडायला विशिष्ट वाळकडूच लागते. व्यक्तीच्या ठिकाणी मनोनिग्रह तेव्हाच बळकट होतो की, जेव्हा त्याच्या स्नेहीसोबत्यांचे व कुटुंबीयांचे दडपण त्याच्यावर असते. प्रॉटेस्टंट शिकवणुकीतून हे मनोनिग्रहाचे वातावरण जन्माला आले. तिसरे असे की, प्रॉटेस्टंट पंथाने स्त्री-पुरुषांच्या साक्षरतेला उत्तेजन दिले. या पंथाचा असा कटाक्ष होता की, बायबल प्रत्येक व्यक्तीने स्वतः वाचले पाहिजे. अखेरचे असे की, प्रॉटेस्टंट समाजात वेळेला महत्त्व दिले जाई. युरोपातील बहुतेक घड्याळजी प्रॉटेस्टंट होते. प्रॉटेस्टंट प्रांतातून घड्याळे अगदी खेड्यातही पोचली होती.

(ई) स्पेनच्या ऱ्हासाचे मुख्य कारण म्हणजे स्पेनमध्ये ज्ञानाची उपासना थांबली होती. कडवी धर्मनिष्ठा हे ज्ञानोपासना थांबण्याचे कारण होते. स्पेनने पुस्तकांवर पूर्वतपासणी (सेन्सॉरशिप) बसवली होती. प्रॉटेस्टंटांनी लिहिलेली धर्मविषयक पुस्तके सोडाच पण ऐहिक शोधांची व शास्त्रीय विषयांची पुस्तकेदेखील स्पेनमध्ये आणता येत नसत. विद्यापीठांतून सनातनी धर्मविचाराखेरीज दुसरे काहीच शिकवले जात नसे. स्पॅनिश विद्यार्थ्यांनी परदेशी जाऊन शिकायलाही बंदी होती. स्वतंत्र विचार व वादविवाद यांच्यावर गुप्तहेरांकरवी व खबऱ्यांकरवी नजर ठेवण्यात येत असे. कोणती गोष्ट ज्यूंना

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

साजेशी ठरवून शिक्षेला पात्र होईल याचा नेम राहिला नव्हता. डुकराचे मांस खात नाहीत — मग तू ज्यू आहेस; रविवारी चर्चमध्ये गेला नाहीस — तू धर्मलंड झालास; रोज अंघोळ करतोस — म्हणजे तू घाण होत असला पाहिजेस — म्हणजेच पाखंडी असला पाहिजेस, असा छळ सुरू झाला होता.

धार्मिक कडवेपणापायी स्पेनने आपल्या देशातून मुसलमानांना व ज्यूंना हाकलून दिले. एन्क्विझिशन बसवले. जो कॅथॉलिक धर्माशी पूर्ण निष्ठावान नाही, त्याचा छळ होऊ लागला. चेटूक करण्याबद्दल शेकडो लोकांना जाळून मारण्यात आले. धार्मिक कट्टरपणामुळे स्पेनमध्ये वैज्ञानिक क्रांती पोचलीच नाही. हार्वेने रक्ताभिसरणाचा शोध लावला. पण स्पेनमधले वैद्य ही उपपत्ती तपासायलाही तयार नव्हते. असहिष्णुता, अंधश्रद्धा, अज्ञान यांची लागण व्हायला व त्यांचे वळण लागायला वेळ लागत नाही; पण समाजाच्या मनातील ही जळमटे काढायला फार कष्ट घ्यावे लागतात.

⌘⌘


**सर्व धर्म अध्ययन केंद्र**

**हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन**
मे.पुं. रेगे
(पृष्ठे ११६; किंमत रु. २५.००)

**भेदविलोपन : एक आकलन**
डॉ. अशोक केळकर
('मिस्टिसिझम' आणि 'मिस्टिक अनुभव' यांची नवी, विचारप्रवर्तक मांडणी.
पृष्ठे ३८; किंमत रु. २०.००)

**बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार**
प.ल. वैद्य
(या विषयावरील एका मौलिक परंतु दुर्मिळ ग्रंथाचे पुनर्मुद्रण. किंमत रु. ३०.००)

**धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार**
दि.के. बेडेकर
(आवृत्ती दुसरी; पृष्ठे ६४ + ८; किंमत रु. २०.००)

संपर्कासाठी पत्ता : **सचिव, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)**


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

# *प्रारंभ*च्या निमित्ताने

## वसंत पळशीकर

– १ –

'नवकथे'च्या आद्य प्रवर्तकांपैकी एक, ही गंगाधर गाडगीळांची मराठी साहित्याच्या क्षेत्रातील ठळक ओळख. मराठी लघुकथेला आणि ललित साहित्याला गाडगीळांनी काय काय दिले याविषयी अपार कौतुक व आदरमिश्रित लेखन *गाडगीळांच्या कथा*च्या प्रस्तावनेच्या रूपाने प्रा. श्री.पु. भागवतांनी केलेले सुपरिचित आहे. मर्ढेकरांनाही गाडगीळांच्या प्रतिभेविषयी कायम आदरच कसा व किती वाटत आला हेही भागवतांनी आवर्जून नमूद केले आहे.

ज्या लेखनाचा पल्ला आणि आवाका, दोन्ही मोठाच असतो अशा कादंबरीलेखनाकडे गाडगीळ वळले त्यालाही बरीच वर्षे झाली. लोकमान्य टिळकांच्या व्यक्तित्व, जीवन व कार्य यांचा विराट पट उलगडून समोर ठेवण्याचे थोर लक्ष्य गाडगीळांनी समोर ठेवले होते. लोकमान्यांची चरित्रे अनेकांनी लिहिली होती. त्यांच्यात आणखी एका वृहत्-चरित्राची भर घालण्याची गोष्ट करावयाचे त्यांनी नाकारले. आधी महाराष्ट्राच्या आणि नंतर भारताच्या राजकीय-सार्वजनिक जीवनाच्या एका कालखंडावर टिळकांनी आपला ठसा उमटविला. उच्चवर्णीय नवशिक्षित वर्गाची मनोधारणा व संवेदनशीलता टिकळांनी इतकी काही पक्केपणाने घडविली, की न्यायमूर्ती रानडे व नामदार गोपाळ कृष्ण गोखले हे एका अर्थी कायमचे झाकोळले गेले आहेत. महात्मा गांधींच्या प्रभावाखाली राष्ट्रसभेचे — इंडियन नॅशनल काँग्रेसचे —राजकारण पूर्णपणे आकारास आल्यानंतरच्या काळात, गांधींनी टिळकांचाच वारसा पुढे चालविला, हीच समज महाराष्ट्रात आजही जास्त रूढ आहे. महाराष्ट्रीयांच्या मनाची जडणघडण करणाऱ्या टिळकांचे 'लोकमान्य' नायकत्व उलगडून समोर ठेवायचे, त्यामधील नाट्य आविष्कृत करावयाचे तर कादंबरीचीच — म्हणजे कलाकृतीची — निर्मिती करायला हवी असे गाडगीळांच्या मनाने घेतले. कादंबरी म्हणून *दुर्दम्य*ची गुणवत्ता खुद्द गाडगीळांना समाधान देणारी, त्यांची आत्म-गौरवाची भावना पुष्ट करणारी राहिली आहे.

*प्रारंभ*च्या प्रास्ताविकात गाडगीळ लिहितात, "जगन्नाथ शंकरशेट यांच्यावर *दुर्दम्य*सारखी कादंबरी लिहावी या हेतूने मी लेखन सुरू केलं आणि मग ते लेखन म्हणू लागलं की मी केवळ जगन्नाथ शंकरशेट यांची कथा नाही तर या मुंबई शहराचीही कथा आहे आणि तेथे ज्या आधुनिक समाजाची आणि माणसांची निर्मिती झाली त्यांची कथा आहे. साहजिकच, नानांच्याबरोबर ज्या माउंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन, जमशेटजी जिजीभाई वगैरे अनेकांनी हे शहर घडवलं आणि ह्या आधुनिक शहराने ज्या अनेकांना घडवलं त्यांचीही ही कथा आहे." (पृ. सात)

ही कथा 'पूर्णपणे वास्तवाधिष्ठित असावी म्हणजे तीत इतिहासाने कथेचं रूप धारण करावं' असंही गाडगीळांनी ठरवलं. पण त्यासाठी त्यांना आबाशास्त्री व त्यांचे कुटुंब ही पूर्णपणे काल्पनिक पात्रं निर्माण करावी लागली, असा खुलासा गाडगीळ करतात. 'इतिहासाचे कादंबरीत रूपांतर करावं' असं त्यांच्या मनात होते. पण, ते लिहितात, 'पण काही ठिकाणी इतिहास अडून बसला आणि म्हणाला की मी इतिहास म्हणून इतका रोचक आहे की मला इतिहास म्हणूनही या कादंबरीत स्थान हवं आणि तो हट्ट त्याने पुरा केला आहे."

प्रास्ताविकाच्या शेवटी त्यांनी केलेला दावादेखील नोंदवायला हवा. तो असा : "उपलब्ध माहितीच्या आधारेच जवळजवळ पूर्णपणे वास्तावाधिष्ठीत कादंबरी मी लिहिली" म्हणजे काय साधले, तर, "मी इतिहासात चैतन्य ओतून तो जिवंत केला आणि त्याची मांडणी करून अनेक कलात्मक आकार तर निर्माण केलेच, पण त्याबरोबरच त्या इतिहासाचा एक अन्वयार्थही लावला."

*प्रारंभ*ची समीक्षा-परीक्षा कोणत्या कसोट्यांवर केली जावी याची खुद्द गाडगीळांनीच अशी स्पष्टता केली आहे, ही एकापरीने चांगलीच गोष्ट आहे.

---

*प्रारंभ*, गंगाधर गाडगीळ, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई २००२, रु. ७७५.००




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई



जगन्नाथ शंकरशेट

– २ –

*प्रारंभ* हा चांगल्याच मोठ्या आकारातील ५३० पानांचा ग्रंथराज आहे. गाडगीळांनी त्यांचे कौशल्य पणाला लावून उभारला आहे. अनेकानेक लहानमोठी दालने असलेला एक मोठा प्रासाद कादंबरी म्हणून वाचण्यासाठी ग्रंथराज हाती घेणाऱ्या सुशिक्षित, नागर, बहुश्रुत सामान्य वाचकाने एवढे मोठे पुस्तक संपूर्णपणे वाचायचे असेल तर ती एकात एक गुंफलेल्या, पण रंजकपणा कायम टिकवून उलगडत जाणाऱ्या उपकथानकांची, एका व्यापक सूत्रामध्ये केलेल्या बांधणी सारखी कहाणी बनली पाहिजे, आणि कहाणीच राहिली पाहिजे, ही एक अंगभूत आवश्यकताच होती.

अव्वल इंग्रजी काळात मुंबईला आधुनिक वैभवशाली नगरीचे रूप प्राप्त करून देण्यात जगन्नाथ शंकरशेट ऊर्फ नाना यांचा सिंहाचा वाटा होता. वर स्पष्ट केल्याप्रमाणे, ही मुंबई नगरीची व ती घडविणाऱ्या इतर काही महत्त्वाच्या व्यक्ती व घटना यांचीही कहाणी आहे. पेशव्यांचा मुलुख इंग्रजांनी १८१८ साली ताब्यात घेतला तेथपासून *प्रारंभ*चा






अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आरंभ होतो. म्हणजे सुमारे १८२०-२२ च्या आसपास. कादंबरीचे नायक नाना शंकरशेट यांच्या मृत्यूपाशी — १८६५ साली — कहाणी थांबते.

*प्रारंभ*मध्ये नानांशी वाचकाची पाहिली भेट होते तेव्हा त्यांचे वडील शंकरशेट बाबुलशेट हे पेढीचा कारभार पहात असतात. पण त्यांच्या आयुष्याची अखेर आलेली असते. *प्रारंभ*ची सुरूवात तरूण नानांच्या हाती पेढीचा कारभार येण्यापासून होते. अवघ्या चाळीस वर्षांच्या कालखंडाचे चित्रण हा ग्रंथराज करतो.

तशी तर मुंबईची कहाणी पोर्तुगीज भारताच्या पश्चिम किनाऱ्यावर येऊन थडकल्यानंतर काहीच वर्षांमध्ये सुरू होते. पण हा पोर्तुगीज कालखंड बराचसा विस्मरणात गेल्यासारखाच आहे. कधीतरी त्या कालखंडाला इतिहासातले त्याचे योग्य ते स्थान आपण द्यायला हवे. मुंबई बेटे इंग्लंडच्या राजाला आंदण म्हणून मिळाल्यानंतर ईस्ट इंडिया कंपनीचा अंमल प्रस्थापित झाला येथपासून मुंबईच्या बेटांवर एक सतत वाढत राहिलेले व्यापारी बंदर व ठाणे म्हणून मुंबई नगरीचा इतिहास आहे. तरीही, मुंबई इलाख्याचा गव्हर्नर म्हणून माउंट स्टुअर्ट एल्फिन्स्टनने सूत्रे हाती घेतल्यावर ठळकपणे एक वेगळा कालखंड सुरू होतो. मुंबई हे भारतातील ब्रिटिश साम्राज्यवादी सत्तेचे एक मुख्य केंद्र बनते. हे मन्वंतर अद्यापिही अपूर्णच राहिले आहे असे म्हटले गेले आहे (पहा : *अपूर्ण क्रांती*, रा.भा. पाटणकर, मौज प्रकाशन, मुंबई). त्या मन्वंतराचा प्रारंभबिंदू १८१८ हाच आपण मानतो, आणि त्यात तथ्यही आहे.

आबाशास्त्री व त्यांचे कुटंबीय या काल्पनिक पात्रांच्या आधाराने गाडगीळ नाना शंकरशेट यांच्या चरित्रकहाणीची कादंबरी रचतात. ही सर्व मंडळी मूळात पुण्याची दाखविण्यात आरंभालाच गाडगीळ यांना कर्मठ सनातनी ब्राह्मण संस्कृती व मानस यांचा मुंबईच्या वाढत्या, बदलत्या संस्कृती व मानस यांच्याशी विरोध प्रस्थापित करावयाचा आहे. आबाशास्त्री मुंबईस येतात त्या आधी काही काळ त्यांचा पुतण्या व त्याच्या आई (यमुनाबाई) मुंबईत स्थलांतरित झालेल्या दाखवलेल्या आहेत. पुतण्या बापू हा कॅप्टन जॉर्ज जर्व्हिस यांच्या हाताखाली नोकरीला लागलेला, थोडं इंग्रजी शिकून घेतलेला, हुशार व धडपड्या मुलगा. कॅप्टन जर्व्हिस हे तत्कालीन एक महत्त्वाचे व्यक्तिमत्त्व. पूर्णपणाने ऐतिहासिक. ईस्ट इंडिया कंपनीच्या नोकरीत बांधकामे करणारे, मराठी चांगले जाणणारे व एतद्देशीयांविषयी तुच्छभाव न बाळगणारे गृहस्थ. नवे शिक्षण येथे रुजविण्यात पुढच्या काही वर्षांमध्ये मोठी कामगिरी यांनी पार पाडलेली. आबाशास्त्री मुंबईला येतात त्या आधीच शंकरशेट यांनी आबाशास्त्र्यांसाठी त्यांच्याकडे त्यांना साजेसे काम असल्याचे सूचित केलेले असते. शंकरशेट हे मुंबईतले एक बडे, हिंदू शेठ-सावकार, हिंदूधर्माभिमानी, दानशूर व नव्या जमान्याचे स्वागत करण्याच्या भूमिकेत स्थिर झालेले. त्यांच्या मालकीच्या ताडदेव येथील भवानीशंकराच्या देवळात पूजाअर्चा करण्यासाठी ते आबाशास्त्र्यांची नेमणूक करतात.

इंग्रजांचे राज्य प्रस्थापित झाल्याने भारतात एक मन्वंतर घडून येण्यास आरंभ झाला, आणि ही सारी घडामोड गाभ्याशी, मोक्याच्या जागी राहून आबाशास्त्री बघणार आहेत, समजून घेण्याचा यत्न करणार आहेत. कारण ते नाना शंकरशेट यांच्या चाकरीत पण घरातलेच एक प्रौढ व जाणते पुरुष म्हणून वावरणार आहेत. ते जुन्या, ब्राह्मणी वळणाचेच शेवटपर्यंत राहणार आहेत. तर त्यांचा पुतण्या हा नव्या बदलांमध्ये, त्या सोबतच्या व्यवहारांमध्ये उत्साहाने सक्रियपणे सतत एक गौण मदतनिसाची भूमिका पार पाडणार आहे. आबाशास्त्र्यांचा मुलगा वामन हा नव्या मुंबईत लहानाचा मोठा होतो. तो उगवत्या नवशिक्षित पिढीचा प्रतिनिधी बनणार आहे.

*प्रारंभ* ही कादंबरी म्हणून उभी राहणार की नाही हे, एका अंगाने, आबाशास्त्री, बापू, वामन आणि त्यांच्या कुटुंबातील अन्य सदस्य ही पात्रे किती समर्थपणे गाडगीळ प्रस्थापित करू शकतात यावर अवलंबून राहते.

मुंबई शहर हेदेखील या कादंबरीतील महत्त्वाचे पात्र आहे. हे गाडगीळांनाही अमान्य होणार नाही. हे पात्र उभे राहावयाचे, या पात्राला खोली आणि भरीवपणा प्राप्त व्हावयाचा तर गाडगीळांना एकदोन आणखी काल्पनिक पात्रांची निर्मिती करणे आवश्यक होते. श्री. प्रताप वेलकर यांचे *'पाठारे प्रभूंचा इतिहास'* (श्रीविद्या प्रकाशन, पुणे, १९९२) वाचताना असे लक्षात आले की, आधुनिककालीन, व्यापारी बंदर व शहर म्हणून मुंबईच्या निर्मितीमध्ये शेणवी व पाठारे प्रभू या दोन जमातींचा ठळक हातभार लागलेला आहे. तसाच पारशांचा. यांच्यामधून गाडगीळांनी दोनतीन काल्पनिक पात्रांची निर्मिती करण्याची जरूरी होती. कोळी, भंडारी, आग्री अशा जमातींची पार्श्वभूमी उपयोगात आणून पात्रनिर्मिती केली असती तर अधिकच मोलाचे ठरले असते.


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका



माउन्ट स्टुअर्ट एल्फिन्स्टन

२८/१/०३



एल्फिन्स्टन हायस्कूल

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हे का आवश्यक होते, हा प्रश्न उपस्थित होईल. पेशवाईच्या कालखंडात पोर्तुगीजांच्या सत्तेचा ऱ्हास झपाट्याने झाला व इंग्रजांची सत्ता प्रस्थापित झाली, आणि इंग्रजांच्या व्यापारी सत्तेचे मुंबई हे पश्चिम किनाऱ्यावरील मुख्य ठाणे म्हणून उत्कर्ष पावले. मराठे व मुघल या दोन्ही सत्तांचा मुंबईवर अंमल नव्हता; ईस्ट इंडिया कंपनी एक स्वायत्त, सार्वभौम सत्ता म्हणून प्रस्थापित झाली. शंकरशेट, जमशेटजी जिजीभाई व त्यांच्या पिढीतली अन्य मातब्बर मंडळी *प्रारंभ*मध्ये धनाढ्य म्हणून प्रस्थापित झालेली नजरेस पडतात व मुंबईच्या सार्वजनिक जीवनात — आर्थिक, सामाजिक-सांस्कृतिक अशा दोन्ही — महत्त्वाच्या भूमिका ती पार पाडताना आढळतात. हे काही अकस्मात घडून आलेले नव्हते. ईस्ट इंडिया कंपनीचा व्यापार व राजकारण यांना त्यांची महत्त्वपूर्ण मदत लाभलेली होती आणि कंपनीच्या अंमलाखालीच त्यांची भरभराट झाली होती; नव्हे, होऊ शकली असती. पेशव्यांच्या मुलुखावर; व एकूणच भारतावर, १८१८ मध्ये कंपनीची ज्या प्रकारची सत्ता प्रस्थापित झाली, त्याने मुंबईचे स्थान व चारित्र्य वदलले. हे स्थित्यंतर मुंबईतल्या या मंडळींना चांगलेच लक्षात आले असणार. ईस्ट इंडिया कंपनीतल्या अनेक अंमलदारांनाही नव्या स्थित्यंतराशी जुळवून घेणे सोपे गेले नसणार. बंगालची दिवाणी इंग्रजांच्या हाती आल्यानंतरच्या, स्थूलमानाने १७६५ नंतरच्या ५०-५५ वर्षांच्या काळातले हे स्थित्यंतर ज्यांनी अनुभवले आणि जे १८२० नंतरच्या मुंबईतही क्रियाशील राहिले अशांमध्ये शंकरशेट (पिता-पुत्र) व जमशेटजी जिजीभाई यांचा समावेश आहे. या कारणाने खास मुंबईकर पात्रेही *प्रारंभ*मध्ये गाडगीळांनी निर्माण करणे आवश्यक होते.

गाडगीळांनी हे न केल्याने काय होते? *प्रारंभ* हा १८२० ने १८६५ च्या दरम्यान झालेल्या मुंबईच्या वाढविस्ताराचा 'गोष्टीरूप इतिहास बनतो. नाना शंकरशेट व इतर काही ठळक असामी यांच्याभोवती रचलेला, सुमारे पन्नास वर्षांच्या कालात मुंबईचा जो काही कायापालट होत गेला त्याचे, शक्य तेथे नाना शंकरशेट व जमशेटजी जिजीभाई यांना मध्यवर्ती ठेवून रोचक प्रसंग व संभाषण यांद्वारा वर्णन करण्यावर गाडगीळ यांचा भर रहातो. या प्रसंग-संभाषणांमागे ज्या घटना वा घडामोडी होत्या त्या इतिहासाचा भाग असतील याची खबरदारी गाडगीळांनी घेतली आहे. पण अशा वास्तव-काल्पनिक प्रसंगचित्रण व काल्पनिक संभाषण यांच्या भरवशावर कादंबरीची उभारणी होऊ शकत नाही.

– ३ –

चरित्राचा नायक आणि कादंबरीचा नायक यांत गुणात्मक अंतर कोणते असते?, आणि असायलाच हवे? हा प्रश्न येथे उपस्थित होतो. बाह्य, सार्वजनिक असे एक वास्तव असते आणि आंतरिक, खाजगी असे एक वास्तव असते. उदाहरणार्थ, बाह्य, सार्वजनिक जीवनातील प्रसंगांमध्ये, चारचौघांसमोर माणूस कायम वोलत असतो, विचार प्रकट करतो, डावपेच लढवतो, भूमिका घेतो त्याचा आपल्या वर्तुळातील मित्रांमध्ये, जवळिकीचे नाते असलेल्या व्यक्तींमध्ये, याच प्रसंगांविषयी तो त्याचे मनोगत खाजगीत व्यक्त करतो व त्याच्या प्रतिक्रिया खुलेपणाने प्रकट होऊ देतो. प्रसंगी त्याच्या अशा खाजगी प्रतिक्रिया, त्याचे मनोगत खाजगी पत्रे, रोजनिशी यांमध्ये टिपले जाते. यांच्याही पलिकडे त्याच्या आंतमध्येही काही वेळा बरेच काही घडत असते, ज्याची दखल माणूस घेत नाही, घेऊ धजत नाही. सूक्ष्म गोष्टी संवेदनक्षम मनाने 'पकडू' शकणाऱ्या जवळपास वावरणाऱ्या व्यक्तीच्या लक्षात यातले काही येते. तरीही, प्रातिभ कल्पनेने, अंतर्दृष्टीने जाणून घेण्यासारखे काही उरतेच.

खाजगी पत्रे, संभाषणे, रोजनिशी, जवळच्या व्यक्तींची निरीक्षणे इ. स्वरूपाची कागदपत्रे, माहिती काही व्यक्तींच्या बाबतीत कालांतराने कमीअधिक विपुलतेने उपलब्ध होते. या साऱ्यांचा वापर करून विस्तृत व सखोल असे चरित्र साधार लिहिले जाऊ शकते. ते अतिशय चित्तवेधक व उद्बोधकही ठरू शकते. व्यक्तित्व चहुअंगानी सामोरे आल्याचा प्रत्ययही येऊ शकतो. तरीही ते चरित्राच्या लक्ष्मणरेषेच्या आतच राखण्याचा निर्णय लेखकाने घेतलेला असतो. आत्मचरित्र हे तर ती व्यक्ती स्वतःबद्दलच लिहीत असते. स्वतःविषयी काय सांगावयाचे व काय नाही हे ती व्यक्ती ठरवते. जे घडले नाही ते घडले या आशयाचे असे एकही विधान प्रत्यक्षाप्रत्यक्षरित्या करावयाचे नाही हे पथ्य एखाद्या लेखकाने काटेकोरपणे पाळले तरी, आत्मचरित्र ही कादंबरी ठरत नाही.

एका अंगाने कादंबरी ही कहाणी असतेच, कोणत्याच पातळीवर जी कहाणी नाही ती कादंबरी होऊच शकत नाही.






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई



बाळशास्त्री जांभेकर

THE
BOMBAY DURPUN.
दर्पण

ADVERTISEMENT.

NOTICE.

TO BE SOLD

CIVIL APPOINTMENTS.

TERRITORIAL DEPARTMENT.

POLITICAL DEPARTMENT.

TERRITORIAL DEPARTMENT.

**The Bombay Durpun**
**दर्पण**

पण कहाणीला कादंबरीचा दर्जा प्राप्त होण्यासाठी तिच्यात आणखी काही गुण अंतर्भूत असायला लागतात. कादंबरीला एकंदर एक घाट असतो, तिचे म्हणून एक रूप असते. कादंबरीतल्या प्रत्येक पात्रालाही एक घाट/रूप असते, हे प्राथमिक विधान झाले. पण ज्याला आपण घाट म्हणतो, रूप म्हणतो ते काय असते?

जीवनाचे सत्यं व अर्थ जाणण्याच्या निकराच्या प्रयत्नाची परिणती घाट वा रूप अभिव्यक्त होण्यात होते असे म्हणता येईल. 'प्रयत्न' या शब्दाचा व्यवहारातला एक रूढ अर्थ आहे. तो येथे पुरा पडत नाही. 'प्रयत्न' या शब्दाच्या ऐवजी आपण 'शोध' हा शब्दही वापरू शकतो. तसेच 'दिसणे', 'दर्शन घडणे' या शब्दांद्वारेही आपण त्याची स्पष्टता करू शकतो. माणसाचे व्यक्तित्व आणि जीवन म्हणजे केवळ बाहेरून दिसणारी घटितांची, तथ्यांची मालिका नसते. त्यांना एकत्र आणणारे, बांधणारे अंत:सूत्र असते, आणि ते प्रतिभेने, कल्पनेने जाणावे, बघावे लागते. जाणीव आणि नेणीव या दोहोंसह ही जाणून घेण्याची, बघण्याची क्रिया घडत असते. एखादी व्यक्ती जेव्हा स्वत:चे व्यक्तित्व व जगणे असे सामग्र्याने जाणून घेऊ म्हणते तेव्हा, स्वत:संबंधीच ही क्रिया असूनही, तिला कल्पनाशक्तीची, प्रतिभेची मदत घ्यावी लागते, कारण तिलाही अतिंद्रियाच्या प्रांतात डोकवावे लागते.

*प्रारंभ* ही कादंबरी कधी झाली असती? जगन्नाथ शंकरशेट यांच्या व्यक्तित्वाचे व जीवनाचे मर्म उकलले जात असतानाच आपणास माणसाचे माणूसपण आणि माणसांचे समूहजीवन यांचेही सामग्र्याने नवे, खोलवर दर्शन घडत आहे, आकलन होत आहे असे जाणवले असते तर असे काही घडत नाही. गाडगीळ असा परकायाप्रवेश करीत नाहीत. नाना शंकरशेट यांच्या चरित्रातील घटना- प्रसंग यांना कल्पिताच्या सहाय्याने अधिक रोचक बनवणे व त्यांचा विस्तार वाढविणे, तसेच समकालीन इतर घटना व प्रसंग यांची माहिती करून देणे एवढेच




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

केले जात राहते. नानांचा गौरव करणारी, त्यांच्या विषयी पूज्यभाव व आदरभाव व्यक्त करणारी वाक्ये – अनेक वेळा, लहानमोठ्या पात्रांच्या तोंडी – येत राहतात. वृहत् चरित्र लिहू म्हणणाऱ्याच्या दृष्टीने उपयोगी अशी, सरकारी दप्तरातील अहवाल व तत्कालीन वृत्तपत्रांमधील वृत्तांताखेरीज कागदपत्रे, रोजनिशी, पत्रे इ. साधने जवळपास उपलब्ध नसावीत.

मुंबई ही देखील कादंबरीची नायक होऊ शकली असती. पण त्यासाठी एका जिवंत व्यक्तिरूपामध्ये प्रथम मुंबईची कल्पना करावी लागली असती. सुप्रसिद्ध लेखक खुशवंत सिंग यांची *दिल्ली* ही कादंबरी येथे आठवावी. तिसरा एक पर्याय होता. कोणी एक व्यक्ती, वा व्यक्ती-सदृश नगरी, ही नायक न करता, इंग्रज राजवटीखालील मुंबईच्या इतिहासातील एक कालखंड हा डोळ्यासमोर ठेवून, एकमेकांमध्ये ज्यांच्या जीवनाची गुंफण होते ('गुंता होतो, असेही म्हणता येईल) अशी अनेक पात्रे निर्माण करून त्यांच्या जगण्यामधून मुंबईची वाटचाल आणि ह्या पात्रांची वदलत गेलेली जीवने यांचे असे एक असे चित्रण करावयाचे की ज्यामधून मुंबईही आपणास अधिक कळेल आणि मानवी व्यक्ती व जीवनही अधिक खोलवर आकळेल. भाऊ पाध्ये यांच्या काही कादंबऱ्यांची येथे आठवण काढता येईल.

– ४ –

एका जगड्व्याळ साम्राज्यसत्तेचे, आर्थिक-औद्योगिक महासत्तेचे अनेक ठाण्यांपैकी एक प्रमुख ठाणे म्हणून मुंबईची वाढ १८१८ नंतरच्या काळात झाली. मुंबई इलाख्याची ती राजधानी वनली. एक नमूनेदार दिमाखदार शहर म्हणून नावाजले जावे, या नगरीचे अभिजन म्हणून स्वतःची ओळख देण्यात भूषण वाटावे असे रूप मुंबईला प्राप्त व्हावे अशी ईर्ष्या मुंबईच्या प्रमुख धनवान, प्रतिष्ठित नागरिकांच्या मनात निर्माण झाली. त्या दिशेने पहिलीवहिली पावले पडण्यास या कालखंडात सुरूवात झाली.

इंग्लंडमध्येही अठराव्या शतकामध्ये, विशेषतः या शतकाच्या उत्तरार्धामध्ये, मन्वंतर घडून येत होते. या क्रांतिकारक परिवर्तनास उद्देशून 'औद्योगिक क्रांती' हा शब्दप्रयोग वापरला जातो. पण परिवर्तन केवळ एका आर्थिक-औद्योगिक क्षेत्रात घडून आले असे नाही. अर्थशास्त्र, तत्त्वज्ञान, राजकीय व सामाजिक विचारप्रणाली, राज्यव्यवस्था, सामाजिक शास्त्रे, इतिहास अशा ज्ञान व व्यवहार यांच्या विभिन्न क्षेत्रांमध्ये आणि समाजव्यवस्थेमध्येही या काळात परिवर्तन घडून येत होते. या सर्वांगीण परिवर्तनाला ज्या काही मोठ्या राजकीय घटनांनी चालना दिली त्यामध्ये अमेरिकन स्वातंत्र्ययुद्ध, फ्रेंच राज्यक्रांती आणि जागतिक वर्चस्वासाठी नेपोलियनच्या फ्रान्सशी झालेले दीर्घकालीन युद्ध यांचे आपले एक विशेष व निर्णायक महत्त्व आहे. नेपोलियनचा अंतिमतः पराभव १८१२ साली झाला. ते वर्ष हे इंग्लंडचे आर्थिक-राजकीय प्रभुत्व जगावर प्रस्थापित होण्याचे आरंभवर्ष म्हणता येईल. युटिलिटेरियनिझम-लिवरॅलिझम या राजकीय-आर्थिक विचार-प्रणालीला अनुरूप अशी खुली भांडवली अर्थव्यवस्था, प्रातिनिधिक लोकशाही राज्यव्यवस्था, नोकरशाही प्रशासन-यंत्रणा, साम्राज्यसत्तेची उभारणी या गोष्टी याच काळात इंग्लडमध्येही आकारास येऊन घट्टपणे प्रस्थापित झाल्या. थोडक्यात, अठराव्या शतकाच्या मध्यापावेतो इंग्लंड व भारत यांची तुलना करता, इंग्लंड अनेक बावतीत भारताच्या पिछाडीवर होते असे चित्र होते. पण, इंग्लिश राष्ट्राच्या भावी सामर्थ्याची पायाभरणी या काळात होत होती; तर भारतातील राज्यसत्ता व समाज यांचे सामर्थ्य आतून पोखरले जाण्याची प्रक्रिया याच काळात गतिमान होत होती. मुघलांना अंकित करण्याइतके मराठे एकीकडे प्रबळ झाले. पण त्यांच्या प्रबळ होण्यामधूनही पोखरले जाणेच वाढले.

*प्रारंभ* मध्ये 'इतिहासाचं कादंबरीत रूपांतर व्हावं' ही गाडगीळांची इच्छा मूर्त होण्यासाठी त्यांना एकाच काळात एक समाज बलशाली बनणं आणि दुसरा शक्तिहीन बनणं या बिंदूपासून प्रस्थान ठेवणं गरजेचं होते. डोळ्यादेखत जी उलटापालट मुंबई-पुण्याच्या जाणत्या प्रतिष्ठित अभिजन व्यक्तींनी – इंग्रज व एतद्देशीय, दोन्ही – अनुभवली, त्याचे मर्म उकलून समोर ठेवणाऱ्या घटना, प्रसंग, संभाषणे इ. काही पात्रांच्या 'जगण्या'च्या माध्यमामधून व आधारे चित्रित करणे जरूरीचे होते. ही संधी गाडगीळांनी वाया दवडली. याचे एकच स्पष्टीकरण संभवते. त्यांचा आलोकच वेगळा आहे. अडचण अशी की, मग या इतिहासाची कादंवरी होत नाही.

इतिहासाचे कादंबरीत रूपांतर होण्याच्या दृष्टीने आबाशास्त्री, वापू व आबाशास्त्रींचा मुलगा वामन ही तीन

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई



ग्रॅन्ट मेडिकल कॉलेज



जे.जे. स्कूल ऑफ आर्ट्स

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पात्रे महत्त्वाची. *प्रारंभ*मधील आवाशास्त्री सतत स्वतःचा उल्लेख 'आश्रित' म्हणून करीत राहतात. ते एका परंपरेचे साक्षी व प्रतिनिधी म्हणता येतात; पुण्यात पेशव्यांची सत्ता त्या सत्तेचे वैभव आणि पेशव्यांची राजनीती त्यांनी जवळून पाहिलेली आहे. पुण्यातही ते पेशव्यांच्या खास मर्जीतल्या सरदारांचे 'आश्रित'च म्हणावयाचे. त्यांच्या व्यक्तित्वात एक कणखरपणा, स्वतंत्र वृत्ती, जाणकार चिकित्सक दृष्टी व चिंतनशीलता गाडगीळ कल्पू शकले असते. मग नाना शंकरशेटांसोबत ते अनेक मुद्यांवरून चिकित्सक संवाद करताना दाखविता आले असते. मराठे व इंग्रज यांच्या संघर्षामध्ये पेशव्यांचा जो दारूण पराभव झाला त्याची खोलवर पोचणारी ऐतिहासिक-समाजशास्त्रीय, बौद्धिक-सांस्कृतिक मीमांसा प्रत्यक्षातील व्यावहारिक उदाहरणांच्या साहाय्याने नाना शंकरशेटांसोबतच्या चर्चांमधून आकारास आली असती. नाना शंकरशेट यांचेही या चर्चांमधून उद्‌बोधन होत जाताना दाखवता आले असते.

एक ऐतिहासिक तथ्य हे नक्कीच होते की शंकरशेट पितापुत्र, जमशेटजी जिजीभाई, त्यांच्यासारखी इतर अग्रगण्य कर्तवगार अभिजनवर्गीय मंडळी ही ईस्ट इंडिया कंपनीच्या व्यापार व राजकारण यांच्या आधारे कंपनीची मदतनीस व लाभार्थी म्हणूनच सधन, प्रतिष्ठित व अभिजन बनली होती. या मंडळींनी, किमानपक्षी शंभर वर्षे तरी, इंग्रजांना त्यांच्या निष्ठा वाहिलेल्या होत्या. हे इंग्रज त्यांच्या लेखी मुख्यतः व्यापारी होते. इंग्रजांच्या वाढत्या आर्थिक व्यवहारांमुळे, त्यांच्या सरशीमुळे त्यांची भरभराट होत चालली होती. पण मुघल व मराठे यांची जागा सत्ताधारी राज्यकर्ते म्हणून ते घेतील आणि एका नव्या धर्तीची साम्राजवादी सत्ता ते येथे प्रस्थापित करतील याची कल्पना त्यांनी केली नव्हती.

हा बदल घडून आल्यावर, आपण काय कमावले व काय गमावले याचा हिशेब मांडायची गरज निर्माण झाली. १८१८ नंतर इंग्रज व आपण यांच्यातला एक नवा उच्च-नीच संबंध - राज्यकर्ते-प्रजाजन असा - प्रस्थापित झाला असल्याचा अनुभव या मुंबईकर मंडळींना लक्षात आल्याशिवाय राहणे शक्यच नव्हते. लष्कर, प्रशासन, न्यायव्यवस्था, महसुली व्यवस्था अशा सगळ्या व्यवहारांच्या क्षेत्रांमध्ये शहाणे, पुढारलेले, बलवान अंमलदार म्हणून, साम्राज्यवादी मानस व चालचलणूक यांमध्ये 'प्रशिक्षित' होऊन पोरवयातील व्यक्ती भारतात येण्यास १८१८ नंतर सुरूवात झाली व यांची पकड वाढतच गेली. गोऱ्या मंडळींचा धर्मनिष्ठ वंशवाद एकोणिसाव्या शतकात भारतात व जगात अन्यत्रही उत्कर्ष पावला. याचे चटके नाना शंकरशेट, जमशेटजी आदि तरुण-वयस्क प्रौढ, दोन्ही पिढ्यांतील मंडळींना वसू लागले. या मुद्यावरून या मंडळींमध्येही वादसंवाद होत असणारच.

कॅप्टन जर्व्हिस यांच्या हाताखाली वापू काम करतो असे गाडगीळांनी दाखवले आहे. जर्व्हिससाहेबासारखी, माउंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन यांच्यासारखी भारतीय संस्कृती, रीतिरिवाज यांच्याविषयी भारतीयांविषयी तुच्छभाव न बाळगणारी - पण त्याचवेळी आपल्या श्रेष्ठत्वाविषयी निःशंक्ही असलेली - इंग्रज मंडळी गाडगीळांनी विशेष अगत्यपूर्वक चित्रित केली आहेत. आता, या मंडळींनाही सनदी प्रशासकांचे प्रस्थापित होत चाललेले नोकरशाही राज्य, यमनियमांचा काच वाढविणारे राज्य बऱ्याच वेळा संतप्त करीत असे. अजाण पण स्वतःच्या अजाणतेचे भान नसलेल्या, साम्राज्यवादी मानस प्रकट करणाऱ्या नव्या प्रशासकांची यांनाही पदोपदी अडचणच वाटत होती. पण त्यांचाही इलाज नव्हता. हा ताणही *प्रारंभ*ला कादंबरी म्हणून उभी करण्याला मदतरूप होऊ शकला असता. गाडगीळांनी दोनतीन इंग्रज पात्रे अशी निर्माण करायला हवी होती की ज्यांनी या बदललेल्या जमान्यातील ताणतणाव प्रकट केले असते. बापूचे पात्र यासाठी विशेष उपयोगी ठरले असते. कारण तो मुंबईत होणाऱ्या उलाढालींमध्ये क्रियाशीलपणे गुंतलेला, सर्वसंचारी, जिज्ञासू दाखविला आहे.

– ५ –

नव्या इंग्रजी शिक्षणाचे प्रवर्तन या काळात केले गेले. या शिक्षणामधून 'भारतीय प्रबोधना'ची घडामोड सुरू झाली. या प्रवर्तनाला गाडगीळांनी *प्रारंभ*मध्ये मध्यवर्ती महत्त्व द्यावे हे योग्यच आहे. वामन हे पात्र या दृष्टीनेच गाडगीळांनी निर्माण केले आहे. पण या इतिहासालाही कादंबरीचे रूप प्राप्त होत नाही. वस्तुतः हे नवे शिक्षण, हा परंपरा आणि आधुनिकता यांच्यातला एक त्या काळातला मोठा संघर्ष-बिंदू होता. कारण शिक्षणाच्या माध्यमामधून ख्रिश्चन धर्मप्रसार करण्याचा मिशनऱ्यांचा आणि नव्या प्रशासक-अंमलदारांपैकी अनेकांचा मानस व प्रयत्न त्यातून स्पष्ट प्रत्ययाला येत होता. या प्रयत्नांना केवळ हिंदू पारंपरिक सनातन्यांचीच तीव्र प्रतिक्रिया नव्हती. पारशी, मुसलमान समाजांचीही प्रतिक्रिया तीव्र व उग्र होती.





अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई



रेव्ह. जॉन विल्सन

नवे शिक्षण घेणाऱ्या तरुणांमधून ज्ञाति, धर्म यांच्या सुधारणेची, धार्मिक- सामाजिक परिष्करणाची, अस्मितांच्या रेखीव बांधणीची आणि जोपासनेची चळवळही अनेक धार्मिक जमाती व ज्ञातींमध्ये उत्पन्न झाली. यातूनही जमाती व ज्ञाती यांच्या अंतर्गत, कुटुंबांच्या अंतर्गत संघर्ष उत्पन्न झाले. हा विषय *प्रारंभ*मध्ये काहीशा विस्ताराने घटना-प्रसंगांना धरून येतो. पण तो इतिहास म्हणून. पात्रांच्या 'जगण्या'मधून यातले ताणतणाव व संघर्ष जिवंत होत नसल्यामुळे या इतिहासाचीही कादंबरी होत नाही.

– ६ –

इंग्रजी अंमलाने जे मन्वंतर घडवून आणले आणि मुंबई नगरीला जे रूप प्राप्त करून दिले त्याचे, आणि ते घडवून आणणाऱ्या इंग्रज राज्यकर्त्यांचे गाडगीळांना फार कौतुक आहे. इतके की त्यांची दृष्टी पुरेशी चिकित्सक भेदकता प्रकट करीत नाही. ते लिबरल-प्रागतिक, आधुनिकतावादी, शहरी, आर्थिक विकासवादी आहेत असे, जागोजागी त्यांनी जी स्वतःची मते — कधी पात्रांच्या तोंडून वा कधी सरळ सरळ — निवेदन केली आहेत यावरून स्पष्ट होते. गाडगीळ हे अर्थशास्त्राचे प्राध्यापक राहिले, आणि गेली अनेक वर्षे, पंचवीस वर्षे वा त्याहून अधिक बहुधा, ते एका विख्यात भारतीय उद्योगसमूहाचे आर्थिक सल्लागार राहिले आहेत. या पार्श्वभूमीवर, त्यांनी मोठ्या कौतुकाने मुंबईच्या काया-पालटाचा *प्रारंभ* चित्रित करावा ही गोष्ट समजण्यासारखी आहे.

एकदा बूर्ज्वा भांडवलशाहीचे प्रवर्तन जगभर करणाऱ्या इंग्लंडच्या पुरते तावडीत सापडल्यानंतर मुंबईची वाढ ज्या स्वरूपाची झाली ती तशी होणे अटळ होते. या वाढविकासाच्या ओघात अनेक व्यक्ती व कुटुंबे कल्पनातीत भरभराट पावली. आता, या प्रकारच्या उलथापालथीमध्ये अनेक व्यक्ती व कुटुंबे बरबादही झाली. पण ही किंमत एकंदर विकासाच्या तुलनेत, 'एवढीतर किंमत मोजावी लागणारच' या वृत्तीने उपेक्षणीयच मानली पाहिजे. ही भूमिकाही *प्रारंभ*मध्ये आढळावी यात काही नवल नाही.

जे घडले ते नाकारता येतच नाही; 'कालाय तस्मै नमः' म्हणून पुढेच वाटचाल करावी लागते. पण मानवी कृतींमधूनच इतिहास घडत असेल तर मानवी पातळीवरून नैतिकनिवाडे तर करायला हवेत. त्या काळात आपण मागे गेलो तर अव्वल इंग्रजी अंमलात घडून आलेल्या व्यापारी ईस्ट इंडिया कंपनीच्या कारभाराच्या जागी इंग्लंडची वसाहतवादी साम्राज्यसत्ता प्रस्थापित झाली. या खांदेपालटासोबत झालेल्या एका बदलाची दखल *प्रारंभ*मध्ये घेतली जायला हवी होती. कंपनीची वृत्ती लोभी व्यापाऱ्याची होती. नैतिक-अनैतिकतेची पर्वा न करता जमेल तेवढी लूट करावयाची. चीनशी वाढत गेलेला अफूचा व्यापार हे याचे एक नमूनेदार उदाहरण आहे. इंग्रजी सत्ता प्रस्थापित झाली त्यानंतर अर्थशास्त्रीय-वैज्ञानिक ('रॅशनल-सायंटिफिक') नियम व कायदेकानून यांचा आधार देत शोषणाची एक निर्घृण व्यवस्थाच उभारली गेली. अनेक गोष्टींचा भार भारतीय जनतेच्या खांद्यावर टाकला गेला.

लिबरल — प्रागतिक आवरणाखाली साम्राज्यवादी-एकाधिकारवादी हितसंबंधांचे लुच्चे-शोषक अर्थकारण व राजकारण त्याकाळी मुंबईतल्या कोणाच्याच लक्षात आले नाही? आधी कंपनीच्या कारभारावर आणि नंतर साम्राज्य-सत्तेच्या कारभारावर अनेक अंगांनी कठोर टीकास्त्र चालविणारे इंग्रज भारतातही होते आणि इंग्लंडमध्येही यांच्यापैकी काही पत्रकार होते. काही अंमलदारही होते. काही मिशनरीही असणार. यांच्या टीकेतले मुद्दे मुंबईतील नवशिक्षितांपैकी काहींच्या पर्यंत १८५० नंतरच्या काळात तरी पोचल्याचे आपणास माहीत

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई



**राजाबाई टॉवर**

आहे. भास्कर तर्खडकर हे एक *प्रारंभ*मध्येही ठळक उठाव दिले गेलेले उदाहरण. पण येथेही एकदोन पात्रांची निर्मिती आवश्यक होती.

*प्रारंभ*चे लेखन गाडगीळांनी मोठी मेहनत घेऊन केले यात शंका नाही. मोठ्या आवडीने व उत्साहाने केलेले लेखन, असेही म्हणावयास हवे. पुराव्याच्या शेवटी जी संदर्भ ग्रंथसूची छापली आहे तिच्यात, मराठी व इंग्रजी मिळून, मोजक्या एकवीस ग्रंथांचा समावेश आहे. यात गाडगीळांच्या मुंबईवरील दोन पुस्तकांचाही समावेश आहे. पण गाडगीळांनी बरीच अधिक साधने पाहिली असणार यात काही शंका नाही. प्रास्ताविकात गाडगीळ यांनी ज्याची 'अहंमन्य संशोधक' अशी संभावना केली आहे त्या जातकुळीची जाणकार समीक्षक मंडळी *प्रारंभ*मधल्याही या स्वरूपाच्या उणीवांवर बोट ठेवू शकतील. तसे त्यांनी केल्यास त्यांची संभावना अहंमन्य म्हणून गाडगीळांनी करणे उचित होणार नाही.

सुशिक्षित, पांढरपेशे, सुस्थितीत असलेले यशस्वी आधुनिक मध्यमवर्गीय मुंबईकर स्त्री-पुरुष हे *प्रारंभ*चे वाचन करतील आणि त्याने ते संतुष्टी-ही अनुभवतील. दीडपावणेदोनशे वर्षांपूर्वीच्या मुंबईचे हे दर्शन तसे मनोरंजन करणारे व सुखावणारे आहे. गाडगीळांच्या बऱ्याच मुंबईकरांच्या मनात, १९३० ते १९५० या काळातील मुंबईच्या सुखद आठवणी येतील. मुंबईच्या उभारणीत महत्त्वपूर्ण सहभाग दिलेल्या अनेक मराठी, पारशी, गुजराती, परदेशी इंग्रज अभिजनांची त्यांची ओळख होईल. जीवघेण्या गर्दीगोंगाटात व प्रदूषित मुंबईत व्यस्त जीवन जगत असतानाही, मुंबईविषयीचा त्यांचा आपलेपणा वाढेल.

पण *प्रारंभ*मधून नाना शंकरशेट वा जमशेटजी जिजीभाई यांची (वा त्यांच्या मुंबईची) अंतरंग-ओळख वाचकांना घडणार नाही. कादंबरीने हे साधते. महाभारतासारख्या महाकाव्यानेही हे, कदाचित अधिक भेदकपणे साधते. गाडगीळ एक बऱ्यापैकी रोचक कहाणी सांगण्यापर्यंतच पोचू शकले आहेत.

⌘⌘

---

*सदर लेखातील छायाचित्रे*, गंगाधर गाडगीळलिखित *प्रारंभ* या पुस्तकातून साभार घेतलेली आहेत.

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

# मनुष्यस्वभावप्रकृती आणि मानवीय अर्थशास्त्राची तात्त्विक मांडणी

केनेथ बुल्डिंग*

मार्क लुट्झ (Mark Lutz) आणि केनेथ लुक्स (Kenneth Lux) या दोघांनी *चॅलेंज ऑफ ह्युमॅनिस्टिक इकॉनॉमिक्स* या मथळ्याचे पुस्तक १९७९ साली प्रसिद्ध केले (बेंजामिन/कमिंग्ज पब्लिशिंग कंपनी, कॅलिफोर्निया, यू.एस.ए.) या त्यांच्या ग्रंथास सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ व विचारवंत केनेथ बुल्डिंग (Kenneth Boulding) यांनी एक प्रास्ताविक लिहिले आहे.

लुट्झ आणि लुक्स हे लेखकद्वय मनुष्यस्वभावप्रकृती आणि तिची संभाव्य अभिव्यक्ती यांच्याविषयी निःशंक आशावादी व आदर्शवादी भूमिका घेतात. या त्यांच्या भूमिकेशी आपली किंचित् असहमती प्रकट करीत प्राध्यापक बुल्डिंग लेखकद्वयांच्या आदर्शवादी-आशावादी भूमिकेची कदर करीत असतानाच, मनुष्यस्वभावप्रकृतीमध्ये सुष्ट आणि दुष्ट या दोन्ही प्रवृत्ती मूलतःच अस्तित्वात व कार्यरत असतात हा सिद्धान्त सत्याच्या अधिक जवळ जाऊन पोचणारा आहे असा आपला अभिप्राय व्यक्त करतात. मनुष्याच्या ठायी असलेल्या सर्व संभाव्य सुप्त शक्ती प्रत्यक्षात साकार झाल्यास एक परममंगल असे जीवन आकारास येईल ही लेखकद्वयाची आशा बुल्डिंग यांना भावडी वाटते. कारण मनुष्याच्या ठायी असलेल्या दुष्प्रवृत्तींचीही सुप्त संभाव्य शक्ती असते आणि तीही सुष्ट प्रवृत्तींच्या बरोबर आविष्कृत होण्याची तेवढीच शक्यता असते ही वस्तुस्थिती, अलीकडच्या इतिहासातल्या हिटलरशाही व स्टॅलिनशाही यांची ठळक उदाहरणे देत, बुल्डिंग यांनी अधोरेखित केली आहेत.

आपल्या प्रास्ताविकात बुल्डिंग आणखी एक मुद्दा स्पष्ट करतात. स्वतंत्रता, आणि आपल्या तंत्राने वागण्याकडे असलेला माणसाचा कल, हे माणसाचे व्यवच्छेदक गुणवैशिष्ट्य आहे; म्हणजेच स्व-तंत्रपणे, इतरांपेक्षा आपल्या इच्छा व बुद्धीनुसार काही वेगळेच वागणे आणि माणसाचे माणूसपण यांचा घनिष्ठ आंतरिक अन्योन्यसंबंध असल्याचे त्यांना आढळते. याचा संबंध ते दोनतीन गोष्टींशी जोडतात. काही गोष्टी या मानवी जीवनधारणेच्या दृष्टीने अनिवार्य अशा दैहिक गरजा असतात; तर इतर अनेक गोष्टी या, या स्वरूपाच्या जीवनावश्यक गरजा नसतात, तर त्यांची माणसाला इच्छा (वांछा) असते या अर्थाने माणूस 'या माझ्या गरजा' आहेत असे म्हणतो. इंग्रजीमध्ये, गरजांसाठी needs हा शब्द आणि वांछित गोष्टींसाठी wants हा शब्द वापरून हा फरक अधोरेखित केला जातो. हा फार धूसर आणि निसरडा प्रांत आहे आणि व्यवहारात असा भेद करणे कितपत उचित व शहाणपणाचे ठरते, अशी शंका बुल्डिंग यांनी व्यक्त केली आहे. एके ठिकाणी ते म्हणतात, "But this minimum ('किमान जीवनावश्यक') cannot really be defined in physiological terms and we are into wants rather than needs before we know where we are."

लुट्झ आणि लुक्स या लेखकद्वयांनी त्यांच्या आदर्शवादी भूमिकेचा भाग म्हणून मानवी जीवनाची उभारणी स्पर्धेच्या ऐवजी सहकार या तत्त्वाच्या आधारे करण्याचे महत्त्व प्रतिपादलेले आहे. बुल्डिंग असे म्हणतात की, माणसाच्या ठायी स्व-तंत्रतेने वागण्याची जी अंगभूत वृत्ती व कल आढळतो तिची पर्याप्त दखल लेखकद्वय घेत नाहीत — सहकार हे एक इष्ट असे मूल्य आहे; सामाजिक संघटनांच्या दृष्टीने ते एक श्रेयस्कर व श्रेष्ठतर असे तत्त्व आहे ही गोष्ट बुल्डिंग यांना मान्य आहे. पण त्याच वेळी ते पुढील अत्यंत महत्त्वाचा मुद्दा मांडतात. एकत्र येऊन सहकार्याने विविध कार्ये पार पाडण्यामधून सर्वांच्या भल्यामध्ये किंवा लाभामध्ये भर पडत असली तरी, मानवी जीवनाला सर्व अंगांनी बहर आणण्याच्या दृष्टीने सहकारामधील संभाव्य शक्तीची मर्यादा फार मोठी आहे. पुढे ते म्हणतात, "आणि बहुधा असेही आढळून येईल की, सुष्ट हेतूंच्या/उद्दिष्टांच्या पूर्ततेसाठी परस्पर सहकार्य करण्याच्या तुलनेत दुष्ट हेतूच्या/उद्दिष्टांच्या पूर्ततेसाठी परस्पर सहकार्य करावे हे अधिक सोपे

* येथे बुल्डिंग यांच्या विचारांचे सारसंकलन सादर केले आहे. त्यांच्या प्रस्तावनेचे हे संपूर्ण व सहीसही भाषांतर नाही. – संपादक

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

जाते. ("It is probably even easier to co-operate for evil purposes than it is for good ones.") तात्पर्य, असे की सहकार ही गोष्ट इष्ट व श्रेयस्कर म्हणून उचलून धरीत असतानाही स्वतंत्र वृत्तीने आपल्या कल्पनेप्रमाणे वेगळ्या वाटा चोखाळण्याची माणसांची वृत्ती व कल याचे मानवी जीवनातील स्थान व महत्त्व कमी लेखता कामा नये.

ज्या गोष्टीला उद्देशून आपण स्पर्धात्मकता, स्पर्धा, स्पर्धेची प्रवृत्ती असे शब्द आपण योजतो त्यांचा उद्‌गम स्व-तंत्रपणे कृती करण्याच्या माणसाच्या ठायी असलेल्या वृत्ती व कल यामध्ये असतो हे जाणले पाहिजे. विकृत कलह, चढाओढ, एकमेकांचे पाय खेचणे आणि दुष्टता हे अधःपतित रूप स्पर्धेला फार चटकन प्राप्त होऊ शकते; एकाचा लाभ ती इतरांची हानी, परस्परांवर मात करण्यासाठीची जीवघेणी 'शस्त्रास्त्र स्पर्धा' आणि एकमेकांना संपविण्याच्या ईर्ष्येपायी वाढत्या स्वरूपातील बेबंद हिंसेच्या भोवऱ्यात खोलवर ओढले जाणे असेही अधःपतित रूप स्पर्धेला प्राप्त होऊ शकते. स्पर्धेला हे अधःपतित रूप प्राप्त करून देणाऱ्या अशा प्रक्रिया ओळखणे, त्या स्पष्टपणे वेगळ्या करणे आणि त्यांचा यशस्वीपणे प्रतिवाद करणे यासाठी आवश्यक ती जाण व समज आपल्यामध्ये उत्पन्न करणे ही गोष्ट अत्यंत महत्त्वाची आहे, हे निर्विवाद. स्पर्धेच्या या अधःपतित रूपाकडे पाहून, स्पर्धेविषयी घृणा उत्पन्न होणे एका मर्यादेपर्यंत नुसते समजूच शकते असे नाही, तर समर्थनीयही आहे असे आपण म्हणू शकतो. मात्र नंतर बुल्डिंग म्हणतात की, स्पर्धेचाच असा अंधळा दुःस्वास हे स्वातंत्र्याच्या बहरण्याचीच भीती मनाला घेरीत असल्याचे लक्षण असू शकते. बुल्डिंग यांचे हे निरीक्षण अत्यंत मार्मिक असून त्यापासून घ्यावयाचा बोध आत्मसात करण्याची नितांत आवश्यकता आहे. बुल्डिंग पुढे असा मुद्दा करतात की, दुसऱ्याचे भले करण्याची वृत्ती आणि स्पर्धा यांच्यात सुसंवाद आणि सुसंगती असू शकते; तशी ती कधीच नसते, अशी आग्रही भूमिका घेणे हे असमंजसपणाचे द्योतक म्हणावयास हवे. आणखी पुढे जाऊन बुल्डिंग असे प्रतिपादन करतात की, एका अर्थी प्रगती, उन्नती, विकास यांचा स्पर्धा हाच एकमेव स्रोत आहे. येथे स्पर्धेचे अधःपतित रूप बुल्डिंग यांना अभिप्रेत नाही हे मात्र विसरता कामा नये. स्व-तंत्रवृत्तीने, स्वतःच्या अभिक्रमाने इतरांपेक्षा आगळीवेगळी, सर्जनशील कृती करण्याच्या प्रवृत्तीमधून ज्याच्यामध्ये तुलना अपरिहार्य ठरते अशा अनेक विभिन्न व वैविध्यपूर्ण कृती समोर येतात आणि यालाच स्पर्धेचे वातावरण म्हणता येते. बुल्डिंग यांना स्पर्धा ही या अर्थाने अभिप्रेत आहे, आणि अधिक चांगले, श्रेयस्कर व प्रगत काय याची व्यक्तींनी खुलेपणाने तुलना करणे, समीक्षा करणे आणि त्याआधारे निवड करणे या चौकटीतील स्पर्धा ही आवश्यक व स्वस्थ असते, असे आपले मत ते ठामपणे व्यक्त करतात. स्पर्धात्मक वृत्ती (competitive spirit) नको, सहकाराची मूल्य म्हणून जोपासना करावयास हवी ही भूमिका आग्रहपूर्वक घेणाऱ्यांनी स्पर्धेविषयीचे बुल्डिंग यांचे विवेचन गंभीरपणे विचारात घ्यावयास हवे, एवढे तर निश्चित म्हणता येते.

देह टिकवण्यासाठी ज्या अत्यावश्यक पायाभूत गरजा भागल्याच पाहिजेत त्या भागवण्याची पातळी ओलांडून जेव्हा आपण वांछेच्या ('जो जे वांछिल तो ते लाहो') पातळीवर जगू लागतो आणि उच्चतर गरजांच्या पूर्ततेची आकांक्षा बाळगू लागतो तेव्हा मूल्ये आत्मसात करण्याची प्रक्रिया सर्वाधिक महत्त्वाची ठरते. आपण जी मूल्ये मानतो ती आपण वह्वंशी 'शिकून घेतलेली' असतात. काही मूल्ये ही तशी भ्रामक वा खोटी असतात या अंगाने समीक्षा करणे युक्तच असते. मानवजातीच्या वाटचालीत मूल्यांच्या क्षेत्रातही एक उत्क्रांतीची प्रक्रिया घडलेली आहे असे निश्चितच म्हणता येते. याचा अर्थ असा की, काळाच्या ओघात मानवाने अधिक उन्नत व प्रगत मूल्ये आपलीशी केली आहेत तसेच अधिक श्रेयस्कर गोष्टींना पसंती द्यावी आणि कमी श्रेयस्कर असलेल्या गोष्टींना नापसंती द्यावी हेही शिकून घेतले आहे. म्हणजे नैतिक संकल्पना, मूल्ये व समज या बाबतीमध्ये वाटचाल अडथळ्या-शिवाय किंवा अगदी सुरळीतपणे झालेली नसली, पुष्कळ चढउतार अनुभवाला आलेले असले, साध्य केलेल्या प्रगतीवर मधूनमधून बोळा फिरवला जाऊन पुन्हा परागती प्राप्त व्हावी असेही घडले असले, तरी एकंदरीने वाटचाल प्रगतीच्या दिशेनेच झालेली आहे आणि ती उलटवता येईल असेही नाही. बुल्डिंग म्हणतात, "But there is also a certain basic irreversibility, in that when we 'wise up', either in our images of fact or of value, we hardly ever 'wise down' again to where we were before." मार्क लुट्झ व केनेथ लुक्स या लेखकद्वयाच्या या बाबतीतल्या आशावादी भूमिकांमध्ये आपणही वाटेकरी आहोत असे बुल्डिंग यांनी म्हटले आहे.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

त्यांच्या प्रस्तावनेत बुल्डिंग आणखी एक मुद्दा करतात. आपल्याला वाटते त्यापेक्षा माणसांना स्व-तंत्रतेची आस पुष्कळ अधिक तीव्रतेने असते आणि स्वतंत्र असण्याचे अर्थ माणसे इतक्या अनेकविध प्रकारे लावतात की थक्क व्हायला होते. मात्र, हे सर्वच अर्थ माणसे स्वतःहोऊन लावत असल्यामुळे, स्वातंत्र्याचा अर्थ असा करताच येत नाही अशी भूमिका घेणे युक्त होत नाही. हे सर्वच अर्थ वैध म्हणून स्वीकृत करून मानवी व्यवहारांची व्यवस्था लावणे क्रमप्राप्त ठरते असे बुल्डिंग यांचे प्रतिपादन आहे.

जबावदारी झटकून टाकण्याचे स्वातंत्र्य आम्हाला हवे, कामचुकारपणा करण्याची मोकळीक आम्हांला मिळायला हवी, मूर्खपणा करण्याची पण स्व-तंत्रता असावी, अशा प्रकारच्या मागण्यादेखील लोक करतात आणि या सगळ्या मागण्या लोक स्वातंत्र्याच्या नावे करतात ही वस्तुस्थिती आहे. उत्पादकांच्या सहकारी संस्था पुष्कळदा अपयशी ठरल्या आहेत, गाळात गेल्या आहेत याचे कारण त्यांच्या पैशाच्या व्यवहारांचे नीट व्यवस्थापन केले गेले नाही हे नसून जबाबदारी घेण्याचे नाकारण्यातूनही सहकारी संस्था अपयशी ठरतात असा अनुभव आहे. "तुम्ही जर पगार चोखपणे घेता तर मग तुम्ही कामही तेवढेच चोखपणे दिले पाहिजे" याला प्रतिसाद मिळतोच असे नाही; "आम्ही काम चोखपणे करू वा न करू पण ठरलेला पगार आम्हांला मिळायलाच हवा", अशी मागणी केली जाते. जेथे आपण काम करतो तेथील सोयीसुविधा, कामाच्या शर्ती यांच्यावर आपले कोणतेच नियंत्रण नाही तरीपण, आपणांस काम मिळाले आहे, तेही बाजारातील खुल्या स्पर्धेमधून मिळाले आहे आणि आपल्याला ठरावीक पगार मिळणार आहे, हे वास्तवदेखील अनेकानेक श्रमिकांच्या दृष्टीने त्यांच्या मनाची उभारी खच्ची करणारे न ठरता खरोखरच त्यांना मुक्तीचा, निश्चिंततेचा, स्वस्थतेचा अनुभव देणारे ठरते, हाही व्यवहारातला अनुभव आहे. हे म्हणून झाल्यावर बुल्डिंग पुढे असेही म्हणतात की, उत्पादकांच्या सहकारी संस्था, सभासदांच्या सक्रिय सहभागाच्या आधारे कार्य करणारी लोकशाही आणि अशाच इतर मनोहारी गोष्टींना सामाजिक जीवनामध्ये त्यांची एक महत्त्वाची जागा जरूर आहे हे ते नाकारत नाहीत.

सुयोग्य तांत्रिक उपायांच्या द्वारे अशा गोष्टींची व्याप्ती वाढविता येते व ती कशी वाढवावी या विषयीही त्यांचे दुमत नाही. पण एकंदर व्यवस्थेत असणारी अशी जागा म्हणजेच संपूर्ण लोकशाही व्यवस्था आहे अशी गल्लत करणे ही मोठी चूक ठरेल. व्यवहारात जबाबदारी घेण्यास नकार देणारे आणि जबाबदारी पत्करून ती चोखपणे पार पाडण्यास तयार असलेले यांच्यात भेद करणे आणि जबाबदारीने काम करणाऱ्या व्यक्तींना त्यांच्या कर्तृत्वाला योग्य तो अवकाश उत्पन्न करून देणारे पद त्यांना देणे, त्या पदाला अनुरूप अधिकार प्रदान करणे आणि अशा रीतीने त्यांना झुकते माप देणे याचा एकंदर मानवी कल्याणात वृद्धी होण्याच्या दृष्टीने विपरीत परिणाम होत नाही हे वास्तव स्वीकारण्याची गरज आहे. अशा रीतीने, बुल्डिंग यांनी आपल्या प्रास्ताविकात लेखकद्वयाच्या भूमिकेशी आपली असहमती प्रकट करीत व्यवहारी शहाणपणाचे बोल ऐकवले आहेत. व्यवहारी वास्तवाचा प्रत्यक्ष ज्यांनी अनुभव घेतला आहे त्या नवसमाजनिर्मितीसाठी शक्ती, बुद्धी खर्च करणाऱ्या कार्यकर्त्यांना त्यांच्या म्हणण्यातील सत्यतेची प्रचिती नक्कीच येईल. आदर्शवादी आणि आशावादी असण्याची निकडही दुसरीकडे बुल्डिंग मान्य करतात आणि या भूमिकेतून लेखकद्वयांचे कौतुकही करतात पण त्याच वेळी वास्तवाचे भान कायम राखण्याची गरजही प्रतिपादतात, असा त्यांच्या प्रास्ताविकाबद्दलचा अभिप्राय आपल्या मनात ठसतो.

⌘⌘

---

## लेखक परिचय


❖ **नीरज हातेकर** : मुंबई विद्यापीठात अर्थशास्त्राचे प्राध्यापक; १७ ते २०व्या शतकापर्यंतच्या महाराष्ट्राच्या आर्थिक व राजकीय स्थित्यंतरांचा विशेष अभ्यास; या विषयावरील पाच-सहा शोधनिबंध प्रथितयश इंग्रजी नियतकालिकांमधून प्रकाशित. **पत्ता** : प्राध्यापक निवास वसाहत, कालिना कँम्पस, मुंबई विद्यापीठ, कालिना, सांताक्रुझ, मुंबई.

❖ **श्री.मा. भावे** : प्राध्यापक, आय.आय.टी. पवई, मुंबई; गणित व तत्त्वज्ञान या विषयाचे ज्येष्ठ अभ्यासक. या विषयांशी संबंधीत २५ शोधनिबंध प्रसिद्ध. शिक्षक चळवळीत सहभाग. **पत्ता** : ३३/२०, ४थी गल्ली, प्रभात रोड, पुणे ४११ ००४.


अनुक्रमणिका




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वैदिक संस्कृत, भाषाशास्त्र, महाभारत-रामायण-भगवद्गीता, संस्कृत वाङ्मय यांचे
गाढे अभ्यासक व रसिक समीक्षक

**प्राच्यविद्यापंडित डॉ. म.अ. मेहेंदळेकृत**

# प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती

**निवडक मौलिक लेखांचा संग्रह**

**विभाग : वैदिक संस्कृती**

तत्को वृत्रः
मित्र (वेद) आणि मिथ्र (अवेस्ता)
श्रद्धा
असि-असित आणि भारतातील लोहयुग
सती : काही प्राचीन संदर्भ
*वैदिक संस्कृतीचा विकास* (समीक्षा)
*उपनिषदांचा अभ्यास* (समीक्षा)
प्राप्य वरान् निबोधत

**विभाग : महाभारत**

भारतीय युद्ध – एक पूर्वनियोजित घटना?
भारतीय युद्ध – एक धर्मयुद्ध?
कौरवांचे 'योगेश्वर' कोण?
यत्र योगेश्वरः कृष्णः
मित्रद्रोहे च पातकम्
मुक्तकेशी द्रौपदी
द्रौपदी वस्त्रहरण
नियतीचा दंड
*महाभारताचा उपसंहार* (समीक्षा)

**विभाग : भगवद्गीता**

*गीताई* (समीक्षा)
*गीताप्रवचने* (समीक्षा)
*गीताचिकित्सा* (समीक्षा)

**विभाग : रामायण**

भारतीय युद्ध आणि रामरावण युद्ध
– एक तुलनात्मक विवेचन
रामायण : समज आणि गैरसमज

व इतर लेख

*प्रा. मे.पुं. रेगे यांच्या विवेचक प्रस्तावनेसह*

डेमी आकाराची ३८+५१६ पृष्ठे, पुठ्ठा बांधणी

किंमत : रु. ५५०/-

*संपर्कासाठी पत्ता* : **चिटणीस, प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)**


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

## प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

सुधारित किंमत : १ एप्रिल १९९७ पासून लागू

| | |
|---|---|
| ■ वैदिक संस्कृतीचा विकास । (तिसरी आवृत्ती) तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३०० रु. |
| ■ अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती | २०० रु. |
| ■ पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास । डॉ. सुमंत मुरंजन | ६० रु. |
| ■ हिंदी साहित्यविचार । प्रा. प्यारेलाल गोहेल | ५ रु. |
| ■ श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदनग्रंथ | ६० रु. |
| ■ संशोधन साधना । डॉ. वसंत स. जोशी | ४० रु. |
| ■ ज्ञानदेव चिंतन (संपादित) । डॉ. वसंत स. जोशी | ४० रु. |
| ■ तरंगयामिक व पुंजयामिक । मा.ग. टोळे | १० रु. |
| ■ आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास । ऋग्वेदी | ८० रु. |
| ■ वागीश्वरी । डॉ. गो.के. भट | ४० रु. |
| ■ प्रस्थानभेद (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण । गं.वा. लेले | २५ रु. |
| ■ गिर्यारोहण परिचय । अच्युत खोडवे | १० रु. |
| ■ इतिहासाचे तत्त्वज्ञान (दुसरी आवृत्ती) । सदाशिव आठवले | ८० रु. |
| ■ दासशूद्रांची गुलामगिरी (भाग २) । शरद् पाटील | १०० रु. |
| ■ शाहीर हैबती । डॉ. शिवाजीराव चव्हाण | ४० रु. |
| ■ गीताचिकित्सा । भाऊ धर्माधिकारी | १०५ रु. |
| ■ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (चरित्र) । सौ. मालती देशपांडे | २५ रु. |
| ■ बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार । प.ल. वैद्य | ३० रु. |
| ■ हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन (सुधारित आवृत्ती)। मे.पुं. रेगे | १६० रु. |
| ■ पाच पुस्तक-परिक्षणे । वा.म. कुलकर्णी | ४० रु. |
| ■ भेदविलोपन : एक आकलन । अशोक केळकर | २० रु. |
| ■ कॉलिंगवुडची कलामीमांसा – एक भाष्य । रा.भा. पाटणकर | ८० रु. |
| ■ न्या. महादेव गोविंद रानडे : व्यक्तित्व, विचार व कार्य | १०० रु. |
| ■ धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार । दि.के. बेडेकर | १५ रु. |
| ■ आचार्य शं.द. जावडेकर : व्यक्तित्व आणि विचार | १०० रु. |
| ■ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार | १५० रु. |
| ■ इहवाद आणि सर्वधर्म समभाव । मे.पुं. रेगे | ८० रु. |
| ■ प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा | २०० रु. |
| ■ चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले | ८० रु. |
| ■ विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर | १२० रु. |
| ■ नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन। द.ना. धनागरे | ४० रु. |

*१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही.पी. ची पद्धत नाही. ३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.*

*संपर्कासाठी पत्ता* : **चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)**


हे मासिक श्री.ग. दीक्षित यांनी मुद्रा, ३८३ नारायण पेठ, पुणे ४११ ०३० येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई